# अनुक्रमणिका

| विषय | | पृष्ठ | | विषय | पृष्ठ |
|---|---|---|---|---|---|

# निवेदन

शारदाश्रम ग्रंथमालेंतील हें सतरावें पुष्प महाराष्ट्र—रसिकांस सादर करतांना मला अत्यानंद होत आहे । या गीताचे संकलनकार श्री०पां०श्रा०गोरे हे प्रसिद्धिपराङ्मुखतेच्या गुणामुळें विशेष नावाजलेले नसले तरी, विदर्भाचे एक प्रतिभासंपन्न कलावंत कवि आहेत. ' बोबडे बोल ' व ' वाणीचा हुरडा ' या दोन रसाळ काव्यसंग्रहाचें प्रकाशन करून, काव्य—यशाच्या मानाचें शेला पागोटें त्यानीं अगोदरच मिळविलें आहे प्रस्तुत गीताचा लवकरच स्मृतिशेष होणारा ' कच्चा माल ' वऱ्हाडातील काही भागात फिरून, देशमुख, पाटील, किसानवर्ग, गुराखी इत्यादिकाकडून त्यानीं परिश्रमाने मिळविला अत्यंत विस्कळित असलेलीं गीतें, त्याचे चरण, वा अर्धचरण याची चोखंदळपणें विषयवारी करून, प्रत्येक कवितेला साजेसे मथळे देऊन, योग्य ठिकाणीं योग्य ओळी वा शब्द उपयोजून, त्यांच्या भोवती असलेल्या ' कैचणकचऱ्या 'तून त्यांनीं ही सौरभशालीं फुलें टिपलेलीं आहेत शिंपल्याच्या जोडींतील इतस्तत· विखुरलेल्या, अर्ध मौक्तिकावस्थेतील मलीन वालुका—कणिकावर, चुनखडी सारख्या द्रवाचें संस्करण करून ' कालव ' ज्या प्रमाणें त्याचें तेजदार मोत्यांच्या जाळयांत रूपांतर करतो, तीच अव्वल दर्जाची कुशलता, या बाबतींत संकलनकारांनी दाखविलेली आहे, असें मला वाटते ।

देशमुखादि वऱ्हाडी लोकांच्या सामाजिक चालीरीती, कौटुंबिक घटना, घरगुती कुळकथा, कणखर ऋजु जीवनक्रम वगैरेचीं विविध प्रतिबिंबे या काव्यांत हुबेहुब उमटलेलीं आहेत. उच्च वर्गांतील सुखवस्तु मराठ—मोळा रमणींनीं रच-लेल्या गीताचें बहुश हें सकलन असल्यामुळे त्या स्त्रियात दृग्गोचर होणारा शालीन रुबाब या गीतांतहि भरून राहिलेला आहे त्यात उच्छृंखल उन्मादता नसली तरी अभिजात अभिरुचीस रुचणारी आर्तता पूर्णांशाने रिंगण घालून राहिलेली

दिसेल स्त्रियांनींच स्त्रीस्वभावांच्या गोफाचे पीळ कलाकुसरीनें विणलेले वा उकललेले असल्यामुळें, या सहजस्फूर्त गीतांना नाटकी कृत्रिमतेचा वास चुकून देखील येत नाहीं. या कलाकृतींतील अर्थ स्त्रियांच्या अनुपम रूपाप्रमाणें लोभनीय असून, नादमाधुर्य त्यांच्याच किन्नरस्वराप्रमाणें श्रवणसुभग आहे! चालीचा एकजिनसीपणा जाणवतो; पण एकतारीच्या एकच एक षड्ज सुराप्रमाणें ऐकायाला तोही अवीट लागतो!

वऱ्हाडी भाषेच्या या प्रातिनिधिक ग्रंथाचें, प्रसिद्ध विद्वान इतिहास संशोधक श्री. य खु. देशपांडे एम् ए. एल् एल् बी यानीं मूलग्राही समालोचन केलेलेंच आहे; त्यामुळे मला आणखी जास्ती कांहीं सांगण्यासारखे नाहीं

शारदाश्रमचे अध्यक्ष लो० नामदार अणे यानीं खास ग्रंथप्रकाशनाकरता पाचशे रुपयांची उदार देणगी दिली त्यातून ३२५ रु. चा खर्च प्रस्तुत सग्रहाकरता झालेला आहे. लोकनायकाचे याबद्दल आभार मानणें अगदीच औपचारिक दिसत असले, तरी त्याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख केल्यावाचून मात्र रहावत नाहीं. सोमेश्वर प्रेसचे मालक श्री. आबासाहेब जोशी यांनीं पुस्तकाच्या छपाईचें काम आस्थापूर्वक व आकर्षक करून दिलें, त्याबद्दल त्यांचेही आभार मानणें आवश्यक आहे.

श्री. गोरे यांनीं वऱ्हाडी भाषेचें वैभव रक्षिण्याची बहुमोल सेवा केली याबद्दल त्यांना महाराष्ट्र–रसिक गौरवाचे धन्यवाद देतीलच; पण असा मौलिक ग्रंथ त्यांनीं शारदाश्रमास प्रकाशनार्थ देऊन त्याची लोकप्रियता वाढविण्यास सहाय्य केलें, याबद्दल संस्थेचा कार्यवाह या नात्यानें मी तूर्त तरी त्यांचे हार्दिक आभार मानून लेखणीस विराम देतों.

श्री. नारायण नागोराव हुड,

बी. ए. एल्एल् बी.

'परागकर्ते' यवतमाळ.

# प्रस्तावना

——0——

१ **संग्रहकार श्री. गोरे:** – शारदाश्रम, यवतमाळ या संस्थेतर्फे लोक-वाङ्मयाचें संशोधन आणि त्याचा अभ्यास चालू आहे, त्याचें दृश्यफल म्हणजे " वऱ्हाडी लोकगीतें " हा ग्रन्थ होय. वऱ्हाडांतील सुप्रसिद्ध कवि आणि शारदाश्रमाचे एक उत्साही सदस्य श्री. पाडुरंग श्रावण गोरे यांनी वऱ्हाडांत विशेषत उमरावती आणि यवतमाळ जिल्ह्यांत फिरून अनेक स्त्रियांच्या तोंडून गाणीं ऐकून तीं जशींच्या तशींच उतरून घेतलीं त्यांनी केलेला हा संग्रह बराच मोठा आहे; तथापि त्यांतील निवडक ८५ गीतें एकत्र करून तीं शारदाश्रमाचा स्वीयग्रन्थ म्हणून प्रकाशित करण्याकरितां त्यानी संस्थेच्या स्वाधीन केलीं. त्यांच्याच संमतीनें, संस्थेनें या ग्रन्थास प्रस्तावना लिहिण्याचें काम माझ्याकडे सोपविल्यामुळे, ते मी अत्यानन्दानें करीत आहे श्री. गोरे यांनी ज्या समाजांतून हीं गीतें गोळा केलीं त्या समाजाचे ते एक घटक आहेत, व ज्या बोलींत हीं गीतें आहेत, तीच त्यांची मायबोली असल्यामुळें, हें संग्रहाचें कार्य त्यांनीं आपुलकीच्या भावनेने मोठ्या उत्साहानें केलें आहे.

२ **मराठीच्या पोटभाषा आणि प्रस्तुत गीतांची भाषा:—** आपणास शहरांतून लोक-वाङ्मयाच्या विस्तृततेची आणि विविधतेची इतकी कल्पना येत नाही. परंतु ज्यांना शहर सोडून खेड्यांत जाऊन राहण्याचा आणि तेथील बहुजन समाजाशी, कांही दिवस तरी, एकरुप होण्याचा प्रसंग आला त्यांना या गोष्टीची पूर्ण जाणीव होते. महाराष्ट्राच्या विस्तृत मर्यादेमध्यें, मराठीच्या अनेक पोटभाषा नांदत असल्यामुळें, हें लोक-वाङ्मयही निरनिराळ्या पोटभाषेंतुन विखुरलेलें आढळून येतें. डॉ. ग्रिमर्सन यांनीं आपल्या भाषा पाहणीमध्यें वऱ्हाड मध्यप्रान्तांत १९ आणि दक्षिण महाराष्ट्रांत १९ अशा मराठीच्या, एकूण ३८ पोटभाषांची नोंद केली आहे. प्राचीन विदर्भ म्हणजे,

नागपूर मराठी प्रान्त, वऱ्हाड, निजामचा मराठवाडा आणि पूर्व खानदेश, या भागांत सुद्धा नागपुरी, वऱ्हाडी, घाटावरची ( बालाघाटी ) आणि खानदेशी इतक्या प्रमुख पोटभाषा येतात. नागपूर मराठी प्रान्त म्हटला तरी खास नागपुरी आणि चांद्याची असे दोन भाग पडतात नुसतें वऱ्हाड संबंधानेंच बोलावयाचें झाले तर तेथेंही आपणास पोटभाषेची एकवाक्यता दिसून येत नाहीं. वणी, पांढरकवडा हे तालुके चांद्याच्या भाषेशीं संलग्न आहेत. उलट जळगांव, चिखली, मलकापूर या भागात खानदेशी भाषा जवळ आहे पुसद, वाशीम या तालुक्यांतील भाषा घाटावरील भाषेशी समिश्र आहे उमरावती जिल्हा, अकोल्यांतील कांहीं भाग, यवतमाळ जिल्ह्यांतील यवतमाळ, दारव्हा हे तालुके यांमध्यें राहणारे लोक जी भाषा बोलतात तिलाच वऱ्हाडी पोटभेद म्हणतां येईल. या पोटभाषेंत सुद्धा ब्राम्हण इत्यादि पांढरपेश्याची बोली आणि कृषि-प्रधान वर्गाची बोली असे दोन प्रमुख उपभेद मानता येतील. प्रस्तुत ग्रन्थातील गीतें श्री. गोरे यांनीं विशेषत देशमुख, पाटील इत्यादि उच्च आणि कुलीन घराण्यांतील स्त्रियाकडून आणि प्रसंगविशेषीं सामान्य कास्तकार आणि मजूर इत्यादिकांच्या स्त्रियाकडूनही मिळविलीं आहेत या कारणामुळें पांढरपेशी वर्गाच्या वऱ्हाडी भाषेशी या गीताची भाषा थोड्याशा फरकानें जुळती आहे.

३ **पोटभाषेचा जिवंतपणाः—** येथें ही गोष्ट नमूद करणें अवश्य आहे कीं, अखिल महाराष्ट्राची ग्रान्थिक भाषा आणि सुशिक्षिताची बोली ही सामान्य असल्यामुळें आणि वऱ्हाड-नागपूर प्रांतांत पुरुषांच्या आणि स्त्रियांच्याहि शिक्षणाचा प्रसार झपाट्यानें होत असल्यामुळें, सुशिक्षित स्त्री पुरुषांची भाषा एकाच वळणाची होत चालली असून त्याच्या पुरता तरी पोट भेद लुप्तप्राय होत चालला आहे आपली पोटभाषा आपुलकीनें राखून ठेवण्याची क्षिति बाळगणारे कै. मोरोपंत अभ्यंकर, डॉ केशवराव दफ्तरी या-या सारखे प्रथितयश विद्वान केवळ अपवाद म्हणून आपणास दाखविता येतील. तथापि सुशिक्षिताना सुद्धा बहुजन समाजाशी व्यवहार करताना पोटभाषेचा अवलंब करावा लागतो पोटभाषा जिवत ठेवण्याचें कार्य बहुधा स्त्रिया आणि

बहुजन समाज यांच्याकडून अखंड चालू असते आणि पोटभाषांची तुलना करताना त्यांच्याच भाषेचा अभ्यास करणे अवश्य असते

४ **लोक-वाङ्मयाची विस्तृतता:—** लोक-वाङ्मयाचे ही गद्य आणि पद्य असे दोन विभाग आहेत दोन्ही प्रकारचे वाङ्मय विस्तृत असले तरी ते बहुधा लिपिबद्ध झाले नसून त्याचा प्रसार परंपरेने वाणीनेच होतो. भाषेत रूढ असलेल्या म्हणी, स्त्रियांच्या व्रतांशी संबद्ध असलेल्या कथा आणि कहाण्या, लळितातील, दशावतारातील आणि तमाशातील सोंगाड्या झडल्या, हरदासांच्या आणि पुराणिकांच्या गोष्टी आणि कथा गोंधळ्याची गद्यरूप आख्याने, लहान मुलांना वडील माणसांनी सांगितलेल्या कहाण्या, आणि मनोरंजनाकरिता सांगितल्या जाणाऱ्या कथा आणि कहाण्या यांचा मुख्यत्वे-करून गद्य-वाङ्मयात अंतर्भाव होतो तसेच स्त्रियांची गाणी आणि ओव्या, मुलींचा भोंडल्याची आणि भुलाबाईची गाणी, पोवाडे, गोंधळ्याची पद्यमय आख्याने, लावण्या, भजने, दशावतारातील कवने आणि चौक, कलगीतुऱ्याची कवने, मातामायची गाणी, महादेवाची गाणी इत्यादि विविधप्रकारच्या गीतांचा या पद्य वाङ्मयात समावेश होतो. यावरून कल्पना येईल की, लोक-वाङ्मय किती विस्तृत आहे व या क्षेत्रात कार्य करण्यास केवढा वाव आहे भरल्या गंगेतून एक पळीभर पाणी घेऊन ते जनता-जनार्दनाच्या चरणीं अर्पण करण्या-इतकाच हा ' वऱ्हाडी लोकगीतें ' ग्रन्थ प्रकाशित करण्याचा आमचा हा प्रयत्न आहे

५ **लोक-वाङ्मयाची उपयुक्तता आणि सुशिक्षितांची कामगिरी:—** ऐतिहासिक पोवाडे एकत्र करून श्री शालिग्राम यांनी पुष्कळ वर्षांपूर्वी ते प्रकाशित केले होते. तथापि लोकभाषा आणि सामाजिक संस्कृति इत्यादि दृष्टीने लोक-वाङ्मयाचे महत्व पटवून त्याकडे सुशिक्षितांचे लक्ष वेध-ण्याचे कार्य २५ वर्षांपूर्वी भारत इतिहास संशोधक मंडळाने आपल्या इति वृत्तात धनगरांच्या ओव्या, भोंडल्याची गाणी इत्यादि प्रसिद्ध करून केले आहे. त्या नंतर पुणे, मुंबई, धुळे येथे श्री. दिवेकर शास्त्री, श्री. साने गुरुजी इत्यादि

विद्वानांनीं लोकगीतें प्रकाशित केलीं आहेत गुजराती लोक-वाङ्मया संबंधानें श्री. कालेलकर आणि हिंदी लोक-वाङ्मया संबधानें प. रामनरेश त्रिपाटी यांचीं लिखाणें आणि परिश्रम प्रसिद्धच आहेत महाराष्ट्रांतही श्री मुंडले, पै. शिकंदरलाल आतार, श्री. बेंडे, श्री. राम आठवले इत्यादिकाचे परिश्रम, ज्यांनीं त्याचे निरनिराळया मासिकातील लेख वाचले असतील त्याना कळून येईल. वऱ्हाड-मध्यप्रान्तात सुद्धा श्री वा वी जोशी (मूळ) आणि श्री. वा. कृ. चोरघडे याचे अनुक्रमें चादा आणि नागपूर या भागातील गीतांचे संग्रह लोक-वाङ्मयात उत्कृष्ठ भर टाकीत आहेत अद्याप या वाङ्मयाच्या अभ्यासाकडे सुशिक्षितांचे लक्ष ह्मणावे तसें वेधले नाहीं भाषेच्या दृष्टीने, अथवा ऐतिहासिक, सामाजिक, धार्मिक, सास्कृतिक दृष्टीनें लोक-वाङ्मयाचें महत्व अद्याप, जसें पटावें तसें पटलें नाहीं. ही गोष्ट जरी खरी आहे, तरी या पंचवीस-तीस वर्षांचे अवधीत, मुंगीच्या पावलानेच का होईना पण जी प्रगती झाली आहे, ती नि संशय उत्साहवर्धक आहे लिपिबद्ध नसलेले विस्तृत वाङ्मय धुंडाळून एकत्रित केल्याशिवाय आणि त्याचा अभ्यास केल्याशिवाय आपली भाषा, आपला समाज, धर्म आणि सस्कृति इत्यादि बाबींचा सुसंगत इतिहास आपणास कळणें शक्य नाहीं. ही गोष्ट उघड आहे ग्रीक आणि रोमन संस्कृतीचा पगडा इंग्लंडवर बसण्यापूर्वी इंग्लडांत असलेली संस्कृति शोधून काढण्याकरितां इंग्रज विद्वानांना तत्पूर्वीच्या लोक-वाङ्मयाचा शोध करून त्याचा अभ्यास करावा लागला, ही गोष्ट इंग्रजी वाङ्मयाशी परिचित असलेल्या विद्वानांना सुप्रसिद्धच आहे

६ **लोक-वाङ्मयाची निर्मितिः**— हें एवढें विस्तृत वाङ्मय कोणीं, कसें व कधीं निर्माण केलें हे कळणें दुरापास्तच आहे लोककथा आणि लोकगीतें हीं कोणत्याहि समाजांत आणि कोणत्याहि काळीं अस्तित्वांत होतीं, हें आपणांस उपलब्ध वाङ्मयावरून कळून येतें. लोकभाषेंत रूढ असलेल्या कथांवरून आणि गीतावरून रामायण, महाभारत इत्यादि पुराण ग्रंथांची निर्मिति झाली, असें पाश्चात्य आणि पौर्वात्य विद्वान संशोधकांचें मत आहे. तत्पूर्वी प्रचलित

असलेल्या कथा एवढेंच नव्हे तर तत्पूर्वींच्या गीतांचे अववेष ही पुराणांतून हुडकून काढून ते दाखवूं शकतात. हें वाङ्मय निर्माण व्हावयास अनेक व्यक्तींचे, अनेक शतकाचे परिश्रम कारणीभूत झाले आहेत. लिपिबद्ध नसल्यामुळें तें वाङ्मय वाणीच्याच द्वारा प्रसार पावलें आहे, त्यामुळें त्याला सतत वाहणाऱ्या नदीचें स्वरुप प्राप्त झाले आहे. त्यात निरनिराळ्या ठिकाणावरुन निरनिराळ्यावेळीं वाङ्मयाचे नवीन नवीन झरे मिळून त्याचें जिवंत स्वरुप कायम राहिलें आहे. स्त्रियांचीं गाणीं आणि ओव्या ह्मणण्याची प्रथा अभिलषितार्थ चिंतामणि ग्रंथावरून ११ व्या शतकात ही महाराष्ट्रात सुरूं होती, असें दिसून येतें ११ व्या शतकांतील निदान ४ । ५ तरी मराठी गीतें त्या ग्रन्थांत संरक्षून ठेवेलेलीं आढळून येतात. त्यामुळें त्या गीतांच्या भाषेचें तत्कालीन स्वरूप आपणास पहावयास मिळतें नुकतेंच आढळलेलें एक गीत येथें देत आहे—

बुद्धरूपें जो दानव सुरवचऊणि वेददूषण बोल्लऊणि
माया मोहिया तो माझी पसाऊ करू

हींच गीतें परंपरेनें मुखोद्गत चालत येऊन आपणास आज ऐकावयास मिळालीं असतीं तर त्या गीताची भाषा आज प्रचलित असलेल्या भाषेशी सदृश अशी आढळून आली असती

लोक-वाङ्मयापैकीं पोवाडे आणि लावण्या हाच वाङ्मय प्रकार असा आहे कीं, ज्यातून बहुधा कर्त्याच्या नावाचा निर्देश असतो व क्वचित् कालही दिला असतो. संदर्भावरून सुद्धा कधीं कधीं अंदाजानें काळ निश्चित करतां येतो. अशा तऱ्हेची शाहिरी रचना करणारे सगनभाऊ, होनाजीबाळ, प्रभाकर, राम जोशी, अनंत फंदी इत्यादि अनेक व्युत्पन्न आणि अव्युत्पन्न, ब्राह्मण, अब्राह्मण आणि मुसलमान, प्रसिद्ध आणि अप्रसिद्ध असे कवि महाराष्ट्रांत होऊन गेले. ही प्रथा अद्यापही सुरूं आहे. श्री. विनायकराव सावरकर, श्री. खाडीलकर, श्री मुळे यासारख्या विद्वानानीं मुद्दाम विशिष्ट उद्देशाने शाहिरी काव्य रचना केली आहे. तथापि अंत: स्फूर्तीनेहि पोवाडे, लावण्या इत्यादि-कांची लोक-वाङ्मयांत भर पडत आहे वऱ्हाडांतील दोन उदाहरणें नमुन्या-

दाखल देत आहे. चाळीस वर्षांपूर्वी महागांव येथील मडके या नांवाच्या कुळकर्ण्यावर सरकारी पैसा खाल्ल्याबद्दल आरोप आला, पुढे वाशिम कोर्टात मुकदमा चालून तो निर्दोष सुटला. त्या प्रसंगावर विष्णुदास कवीनें "नका खाउं हो जहर दादा पैसा सरकारी" हा सुप्रसिद्ध पोवाडा रचला वऱ्हाडच्या या भागांत तो पोवाडा प्रसिद्ध असून शारदाश्रमानें प्रसिध्द केलेल्या "विष्णु-दासांची कविता" या पुस्तकाच्या पहिल्या भागात प्रसिध्द केला आहे. सन १३२४ फ (स. १९१४) मध्यें दारव्हा तालुक्यातील आजनी या गावीं राहणाऱ्या धना नावाच्या महाराने आपल्या महाराऊ भाषेत मारवाड्याचा पोवाडा रचला आहे. त्याची एकंदर १५ कडवीं आहेत शेवटचें कडवें असे आहे—

सन तेरासे चोवीसाला । बाकी साहेबाच्या आजनीला ॥
धना भगतानं छंद जोडला । भजुन आहे चवत्राच्या पायाला ॥
आकाजी पाटलाच्या कामाला । बरड्याचं वावर राखायले
महिन्यानं हो दादा ॥ १५ ॥

शेतावर राखण करणाऱ्या मजूर आणि निरक्षर महारानें हा पोवाडा रचला, हें याचें वैशिष्ट्य आहे.

**७ लोक-वाङ्मयाचा आणखी एक प्रकारः—** वऱ्हाड-नागपूर प्रान्तांत दण्डार म्हणून एक करमणुकीचा प्रकार आहे तो सामान्य जनतेंत फार लोकप्रीय आहे. हा खेळ श्रीकृष्ण आणि गोप गोपी यांच्या वृंदा-वनांतील रासक्रीडेवर आधारलेला आहे. गावात प्रमुख जागीं मंडप घालून रंगभूमि तयार करतात लहान मुलांना श्रीकृष्ण, गोप, गोपी याचो सोंगे देतात. नाटकांत रंगभूमीवर नांदीच्यावेळीं जसे नट उभे करतात त्याप्रमाणें या मुलांना ओळीनें उभे करितात. त्यांच्या हातों टिपऱ्या असतात. त्यांच्यामागें तुणतुण (चोंडके) टाळ, ढोलकी वगैरे घेऊन गाणारी व वाजविणारी मंडळी असते. त्यांनीं गाणें म्हणावयाचें व ढोलकीच्या आणि टिपऱ्यांच्या तालावर नाचत मुलांनीं पुढे आणि मागे चालत असावयाचें. मधून मधून निरनिराळीं सोंगेही आणीत असतात. हे खेळ बहुधा दसऱ्या पासून सुरू होतात ते ४ । ६ महिने

चालतात. शेतांतील पीक तयार होत आल्यामुळे, कास्तकारांची मनें प्रफुल्लित असल्यामुळें करमणुकीच्या प्रकाराकडे यावेळीं त्याना लक्ष द्यावयास बरीच सवड असते. या दंडारीमध्यें कृष्ण गोपीची, इतर देवाचीं आणि पुराणातील इतर कथानकांवर हीं रचिलेलीं कवनें म्हणत असतात. देवळी ( जि. वर्धा ) येथें सुमारें १०० वर्षांपूर्वी जगन्नाथ नावाचा एक कवि होऊन गेला, त्यानें महा-भारतांतील कथानकांवर सामान्य जनाला समजेल अशा भाषेत चौक नावाचा कविता-प्रकार रचला आहे. हे चौक दंडारीमध्यें सर्वत्र म्हणत असतात व ते लोकामध्ये फार प्रीय आहेत या चौकाची कल्पना येण्याकरिता एक चौक खालीं देत आहे—

## द्रोणपर्व-अभिमन्युवध

चाल — म्हणे पार्थाला जलदि करावी इकडे केसी गती
विजय म्हणे भय काय आम्हाला तुम्हि असतां सांगाती
पार्थ आणि भगवान् रथारूढ आले शिबिरा प्रति

टीप.— करि नमस्कार धर्मासि तेव्हां फाल्गुन
कां म्लान वदन बोलसी आम्हां लागुन
म्हणे काय वदन दाखवूं तुला सांगुन

मिळवणी —अभिमन्यू पडला रणीं आम्हाला जनीं टाकुनी गेला
रथा खालीं पडला पार्थ कमा अनर्थ वाडिलांही केला जी
धिःकार सर्व वीरांसि तुम्हां युद्धासि बाळ कां नेला

प्रस्तुत उतारा वऱ्हाडचे संस्कृत कवि आणि साहित्यिक श्री. मा ना डाऊ वकील दारव्हा यांनीं जगन्नाथ कवीच्या काव्याचा संग्रह केला आहे व त्यांना मुखोद्गत आहे, त्यांतून तो त्यांनीं पाठविला आहे. जगन्नाथ कवीचे चौक महा-भारताप्रमाणेंच रामायणातील ही प्रसंगावर आहेत.

८ **लोक-वाङ्मयाचा प्रसार:**—या लोक-वाङ्मयाचा जो प्रसार होतो तो केवळ वाणीच्या भरंवशावरच होतो. या वाङ्मयास Survival of the fittest ( चांगलें तेंच टिकतें ) हा न्याय तंतोतंत लागूं पडतो. चांगलीं

गाणीं व चांगल्या कथा यांचा प्रसार लवकर होतो व त्या परंपरेने टिकून राहतात. ज्या कथाची अथवा गीताची जनतेत अभिरुचि उत्पन्न होत नाहीं त्या तशाच लयास जातात आजच्या काळात बोलपटाच्या योगाने आणि ग्रामोफोन रेकॉर्डच्या सहाय्याने गाण्याचा प्रसार महाराष्ट्राच्या कोना कोपऱ्यात सुध्दा तावडतोब होतो. " आर्धा बीज एकले " " यमुनाजळी खेळू खेळ कन्हया चाल "; किंवा " रानांत गेली बाई शोळ " या सारख्या गाण्याचा जनतेत सर्वत्र प्रसार व्हावयास हींच साधनें कारणीभूत आहेत. प्रसार झाला तरी ती टिकून राहणे अथवा त्याचा लोप होणे हे त्या त्या गाण्याच्या योग्या-योग्यतेवर अवलंबून आहे

विष्णुदास कवाचीं " कृष्णा माझा छंद सारा सोडमोडरे " किंवा " चहु कडून आलं आभाळ ग । लेकरु आपलं सभाळ गं " यासारखीं पदे अथवा त्याच्या लावण्या आणि आरत्या, अष्टके, त्याच्या कविताचा संग्रह छापून प्रसिध्द होण्यापूर्वी किती तरी वर्षापासून मराठवाडा आणि पुसद, वाशीम या भागांत अगदी खेड्यापाड्यातून सुध्दा लोकाच्या तोंडी असत शिवकालीं सुध्दा संत तुकोबाच्या अभंगांचा सर्व महाराष्ट्रात प्रसार झाला होता महाराष्ट्रातील भागवत धर्माचें तत्कालीन केंद्र जे पंढरपूर त्या ठिकाणी, सर्व निरनिराळ्या ठिकाणची वारकरी भजनी मंडळी जमत, त्यानी तुकोबाच्या अभंगाचा महारा-ष्ट्रांत सर्वत्र प्रसार केला; अद्यापही ते कार्य सुरू आहे. तुकोबाच्या अभंगांची जनतेवर आजही जी पकड आहे ती अभगांच्या गाथ्याच्या आवृत्तिवर आवृत्ति निघाल्या म्हणून नव्हे, तर वारकरी भजनी मंडळीमध्ये ते परंपरेनें चालत आले आहेत म्हणून.

अगदीं चालू काळाचे उदाहरण घ्यावयाचे म्हणजे वऱ्हाडांतील प्रसिध्द तुकडोजी महाराजाचें. या वीस वर्षांतच ते प्रसिध्दीस आले. त्यानीं केलेलीं. कवनें सोपीं, अर्थपूर्ण आणि कर्णमधुर असतात. त्यानीं खंजिरीवरच्या भज-नाची एक विशिष्ट पध्दत प्रचारात आणली. या वीस वर्षांत जनतेंत वऱ्हाड नागपूर प्रान्तांत इतका प्रसार झाला आहे कीं त्यांचीं कवने म्हणणारी भजनी,

मंडळें गांवोगांवीं निर्माण झालीं आहेत. असलीं मंडळें नसतील तेथें ही भजनांत तुकडोजी बुआंचीं कवनें म्हटलीं जातात एवढेंच नव्हे तर दारावरच्या भिक्षेकऱ्यांच्या तोंडूनही तीं कवनें ऐकूं येतात. लिपिबध्दतेशिवाय नुसत्या मुखानेंच वाङ्मयाचा जनतेंत कसा प्रसार होतो, याचीं उदाहरणें म्हणून वरील उल्लेख केला आहे.

९. **प्रस्तुत गीतांची निर्मिती:—** प्रस्तुत ग्रंथांत संग्रहित केलेलीं गीतें कोणीं रचिलीं हें जरी निश्चयात्मक रीतीनें सांगतां येत नाहीं तरी तीं स्त्रियांच्या दृष्टिकोनांतून बाहेर पडलेलीं आहेत त्यांत स्त्री सहज अंत करणाचा ओलावा आहे, हृदयाला भेदणारे अनुभवाचे बोल आहेत. पिता-माता, बंधुभगिनी, पति, पुत्र यांच्या संबधीं नारीहृदयांत अखंड वाहणारा प्रेमाचा झरा आपणास या गीतांतून आढळेल थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे वऱ्हाडांतील कुलीन आणि उच्च अशा देशमुख, पाटील इत्यादि वजनदार समाजाचें, स्त्री मध्य करून, रेखाटलेलें वास्तविक दिग्दर्शन या गीतांत साठविलें आहे हीं गीतें सहज सुंदर असून त्यांची भाषा प्रसादयुक्त आणि ओघवती आहे. या गीतांत आलेले उपमा दृष्टांत त्या समाजांत वावरणाऱ्या स्त्रियांच्या रोजच्या व्यवहारांत आढळणारे आहेत. या गीतांमधून आपणास कवीची व्युत्पन्नता दिसणार नाहीं; छंद, अलंकार, भाषा, रस इत्यादि साहित्याच्या अंगोपांगाचे, तारावरील डोंबाऱ्याच्या कौशल्या प्रमाणे, अभ्यासानें आत्मसात् केलेली कुशलताही आढळून येणार नाहीं, परंतु या गीतांमधून ओसंडलेली भावनेची उत्कटता आपल्या अंत करणांत अगदीं साता पडद्या पलिकडे जाऊन बसलेल्या वृत्ति उचंबळून सोडतील. सारांश वऱ्हाडांतील पाटील देशमुख इत्यादि उच्च आणि कुलीन घराण्यांतील अंगावर बेताचे पण निवडक अलंकार असलेल्या मर्यादशील आणि निसर्ग-सुंदर अशा महिलाप्रमाणे त्यांचीं हीं गीतेंही सहज सुंदर, हृदयग्राही आणि मनाला आनंद देणारीं आहेत.

सारींच गीतें महिलांनीं रचिलीं असतील असें नाहीं. स्त्रियांकरितां म्हणून रचिलेलीं गीतें ही यांत असणें असंभवनीय नाहीं. प्रसिध्द महाराष्ट्र-

कवि मोरोपंत यांनीं खास स्त्रियांकरिता म्हणून रचिलेली सीता-गीत इत्यादि गीतें प्रसिध्दच आहेत. तसलाच प्रकार या गीतांतही असणें अशक्य नाहीं, गीतांच्या निर्मितीला निरनिराळया स्त्रियांचाही हातभार लागलेला असावा. सकाळच्या निवांत आणि शांत वेळीं जात्यावर हात फिरत असतांना स्त्रियांचें कोमल अंत करण माता, बंधु, पति, पुत्र याच्या भोवती प्रेमरज्जुनें वेढे घेत असतें, अशावेळीं स्फूर्तियुक्त अशा नव्या नव्या ओव्या बाहेर येत असतात, असा अनुभव आहे. त्याचप्रमाणें चार दिवस माहेरपणाकरितां आलेल्या मुली शरदृतुमध्यें माडी पोणिर्मेपासून दिपवाळीपर्यंत आपल्या प्रेमळ भगिनी, समवयस्क भावजया आणि मैत्रिणी याच्यासह चादण्यारात्रीं अगणामध्यें टागलेल्या झोपाळयावर गाणीं म्हणत असतात. तेव्हा नवीं गीतें, नव्या ओव्या अथवा ओव्यांचीं चरणें स्फुरण पावून गीतांमध्यें भर पडणें अगदींच अशक्य नाहीं.

## १० गीतांची भाषा, व्याकरण आणि शद्व संपत्तिः—

वऱ्हाडी भाषेशी परिचित नसणाराकरिता प्रस्तुन गीतातील भाषेसंबधाने चार शद्व लिहिणे अवश्य आहे सर्वमान्य मराठीभाषा आणि प्रस्तुत वऱ्हाडी ग्रामीण भाषा आणि त्याचप्रमाणें नागपुरी ग्रामीण भाषा यामध्ये एक विशेष लक्षात येण्यासारखा फरक आहे. तो हा कीं ण च्या जागीं वरील दोन्हीं उपभाषेंत न येतो आणि ळ च्या जागी वऱ्हाडी ग्रामीण भाषेत य येतो आणि नागपुरी ग्रामीण भाषेंत र येतो हीं गीतें छापताना अखिल महाराष्ट्रभाषीयांच्या सोयी-करता मुळात न आणि य च्या जागीं जेथें सर्वमान्य भाषेंत अनुक्रमें ण आणि ळ येतो तेथें ण व ळच दुरुस्त करून छापला आहे. चटकन लक्षांत येणारा दुसरा विशेष म्हणजे प्रथम पुरुषीं एकवचनीं वर्तमान काळाचा क्रियापदाचा तिन्ही लिंगी तो हा प्रत्यय आहे; आणि तृतीय पुरुषी एकवचनी वर्तमान काळाचा क्रियापदाचा पुल्लिंगी प्रत्यय ते असा आहे. जसे मी ( स्त्रीलिंगी ) जातो; तो जाते इत्यादि क्वचित् ठिकाणीं या गीतांतून सर्वमान्य भाषेशी जुळतीं रूपें दिलीं आहेत; तथापि बहुतेक ठिकाणीं मूळ रूपेंच कायम ठेवेली आहेत. "असें दंडाचा पाळणा वाजते करकीर" ( गीत नं ४८ ); "दोघा नारीचा पुरुष करते विचार

[illegible] " ( गी. नं. २४ ) [illegible] "[illegible]" ( गीत नं. १८ ). तिसरा विशेष या दोन्ही उपभाषांमध्यें [illegible] प्रकर्षानें लक्षात आहे, तो हा कीं माझा, माझी, माझें या ऐवजी माहा, माही, माहें हीं रूपें येतात. [illegible] मराठवाड्यांतील भाषेंत माझा ऐवजी मह्ं असें रूप येतें; हें रूप संस्कृत मह्य-मूळ जवळ आहे. " पहिली माही ओवी " या पहिल्या गीतापासूनच हीं रूपें आढळून येतील.

या गीतांतील शद्बसंपत्तीचा हा विशेष आहे कीं, यांत सर्वमान्य भाषे-पेक्षा अरबी आणि फारशी शद्बांचा भरणा फार आहे. हा मध्यप्रांत वऱ्हाडांतील सर्वच उपभाषाचा विशेष आहे. दुसरी ही एक गोष्ट नजरेस आणावयाची ती ही कीं, या गीतांत प्राचीन मराठींत रूढ असलेले पण हल्लींच्या सर्वमान्य भाषेंत लोप पावलेले, असेही अनेक शद्ब आहेत. वाचकांच्या सोयीसाठीं सर्वमान्य भाषेंत रूढ नसलेल्या काहीं शद्बाचे अर्थ तळटीपात दिले आहेत. या भाषेंत वैशिष्ट्यानें आलेल्या शद्बांची अकारविल्हेनें अर्थासह आणि शक्य तेथें उपपत्ती सह शद्बसूचि तयार करून शारदाश्रमात ठेविली आहे. कागदाच्या महागाईमुळें ती प्रकाशित न करतां मागें ठेवावी लागत आहे. भाषेच्या दृष्टीनें या गीतांचा अभ्यास करण्याची आवश्यकता निर्माण झाल्यास ती सूचिही पुरवणी रूपानें प्रकाशित करतां येईल. अमरसा, अटुळी, आडस इत्यादि कित्येक शद्ब सर्व-मान्य भाषेस अपरिचित असल्यामुळें त्यांचें मूळ शोधून काढणें भाषेच्या अभ्यासाच्या दृष्टीनें अवश्य आहे. तळटीपांत न आलेल्या पण अवश्य वाटलेल्या शद्बांची अर्थासह छोटी सूचि दिली आहे.

या गीतांत आलेलीं कितीतरी वाक्यें म्हणीवजा उपयोगांत येण्या-सारखीं आहेत. जसें " नार पुत्रानें भाग्यवंत " ( गी. नं. २३ ) " कोणीं पाहिला दुःखांत काय दोघीचा गोविंद " ( गी. नं. २४ ) " भरताराचं हलक्या जुनं फाटकं नेसावं । बाप समरथ आई त्याच्या बळावरी नसावं " ( गी. नं. ५१ ) " कुपाच्या आसऱ्यानं वाढे हिरवीं रोप । [illegible] [illegible] तांदे [illegible] वहीण " ( गी. नं. ५८ ) " भांडते [illegible] [illegible] एक [illegible] । [illegible] [illegible]

कधी काडी पाणी वाहते तुटते ? " (गी.नं. ५८) " हसला भरतार कधीं भोळा झणूं नाहीं । नाग उयशाचा काळा जहरी मोठा बाई " ( गी. नं. ६४ ) या प्रमाणें किती तरी उदाहरणें देतां येतील.

**११ गीतांची देवाण घेवाणः**—प्रस्तुत गीतांमधून कांहीं गीतें वऱ्हाडच्या बाहेर गेलीं असतील व काहीं बाहेरूनही आलीं असतील. पण अशी देवाण घेवाण झाल्यावर गीतांच्या भाषेंत, ओव्याच्या आणि चरणांच्या संख्येंतही कमी अधिक फरक झाला असला पाहिजे. श्री. गोंडे यांनी प्रतिभा मासिकांत ( अं. ९ व. १९३३ ) छापिलेलें गीत आणि " मोजे वाघिणीच्या दाढा " ( गी. नं. ५२ ) हें ताडून पाहिल्यास कळेल ही देवाण घेवाण होतांना भाषेचा कसा फरक होतो हें पुढील चरणावरून कळेल " बाई तुम्ही बऱ्या कृष्ण तुमचा बरा । नित्य येतो घरा राधिकेच्या " हा संत एकनाथ महाराजांच्या एका प्रसिद्ध अभंगाचा पहिला चरण आहे मोगलाईंत मराठवाड्यापैकीं आमच्या शेतीच्या गांवीं भजनामध्यें तो चरण " बाइ तूमि बऱ्या किसन तुम्चा बरा । नीत येते घरा राधीकेच्या " याप्रमाणें ऐकावयास मिळाला. आपल्या बोलीशी मिळतें घेण्याचा हा स्वाभाविक धर्म सर्वत्र आढळून येतो.

**१२ गीतांचें अंतरंगः**— लोक-वाङ्मयासंबंधानें आणि प्रस्तुत गीतांसंबंधानें प्रास्ताविक स्वरूपाचे विवेचन केल्यानंतर गीतांच्या अंतरंगांत प्रवेश करावयाचा. वाग्देवीच्या मंदिराच्या प्रवेशद्वारापर्यंत आणून सोडण्याची उपाध्यायाची तेवढी कामगिरी माझ्याकडे होती मंदिरांत प्रवेश केल्यावर वाग्देवीशी समरस होऊन तिच्या गुणांचा आस्वाद घेण्याचे कार्य रसिक वाचकांवरच सोपविणें योग्य आहे. व्याख्यान ऐकण्यापेक्षा साखरेची गोडी प्रत्यक्ष रसनेनें चाखल्यावर उत्तम कळते. प्रस्तुत गीताची गोडीही वाचकांना प्रत्यक्ष अनुभवानेंच कळण्यासारखी आहे प्रस्तुत संग्रहांत एकूण ८५ गीतें आहेत विषयांचे वर्गीकरण न करतां श्री. गोरे यांनी गीतें निवडून प्रत तयार केली, तोच क्रम कायम ठेवून गीतें छापिलीं आहेत. तसा वास्तविक एका गीताचा दुसऱ्या गीताशी संबंध नाहीं. आपापल्यापरी तीं स्वतंत्रच आहेत.

यांत देवादिकांचीं गीतें आहेत पुत्रवात्सल्य, पतिपत्नि प्रेम, पितापुत्री, बन्धुभगिनी इत्यादि संबधांचीं गीतें आहेत विवाह, पुत्रोत्सव इत्यादि मंगल प्रसंगावर गीतें आहेत. द्विभार्या संसार, विवाहित आणि पाटाच्या पत्नींचा संबध, पतिपत्निविरह इत्यादि अनेक विषय या गीतामधून हलुवारपणें हाताळले आहेत. या गीतामधून सर्वत्र आढळणारी भावनाच्या धाग्याची गुंफण सरसतेनें उकलून दाखविण्याचें कार्य, कलेपेक्षा शास्त्राला जास्त महत्व देणाऱ्या माझ्या सारख्या वेदाभ्यासजडाच्या हातून जमावयाचे नाहीं. तें कार्य भावनाशी समरस होणाऱ्या कुशल कलाभिज्ञांनी करावयाचें आहे. तथापि सर्वत्र व्यवहारातील समर्पक उपमा, ‘ उगवला नारायण ’ या गीतातील सुंदर उत्प्रेक्षा. ‘ काय वहिनी मनांत ’ या गीतातील हृदयाला गुदगुल्या करणारा गोड विनोद या सारखीं अनेक शोभा स्थळे या गीतामधून विखुरलेलीं आहेत, त्याकडे नुसता अंगुलिनिर्देश तरी केल्यावाचून राहवत नाहीं रसिक बंधुभगिनी प्रस्तुत गीतांचा प्रेमाने आदर करतील असा मला भरवसा वाटतो.

शारदाश्रम,<br>
यवतमाळ<br>
१-११-४२

यशवंत खुशाल देशपांडे.

# जोहार !

झोळी फाटक्या चिध्याची मारूनिया बगलेला
पाय टाकतां दारांत हात लावला पोटाला !
केली बारिक पिठाची भाकर ती फोफेदार
पान केळीचे मांडून जेऊं घातला महार !
कोर तुकडा वाढला आत्मा माह्या निववला
सुगरिणी मायबाई ! नांव तुमच्या पित्याला !
फेडूं कसे उपकार झाला थोर डोई भार
मुके पायाचे लेकरू करे लवून जोहार ! !

श्री० पांडुरंग श्रावण गोरे,
पांढरकवडा.

# वऱ्हाडी लोकगीतें

## पहिली माही ओवी : : : : १

पहिली माही ओवी पहिला माहा नेम
तुळसीखाली राम

दुसरी माही ओवी गाते पाची पांडवाला
पाठच्या भावंडाला

तिसरी माही ओवी गाईन साऱ्या गोता
देवा! माझ्या रघुनाथा !

सासरा मोतीदाणा. सासु रतन माउली
नवरत्नांची पेवळी !

सासरा महादेव सासुबाई पारबती
आले पोटी गणपती !

माहे वडील मामाजी अशी देवाची मुरत
मामी गंगेचे तीरथ !

वडील चुलता बाई ! आहे घराला मंडण
चुलती बिजलीचं पान !

बाई ! वडील भासरा, जन्माचा माहा भाऊ
काशी गंगेवाणी जाऊ !

खोडेल देर पुरा टाके अंगावर पाणी
भिजे साडी मिरादाणी !

---

१ खाण

## वऱ्हाडी लोकगीतें

रंगेल कसा दीर टाके अंगावर पीठ
भरे चोळी रत्नटीक !

नंदा आम्ही भावजया लोक म्हणती " बहिणी "
नातं चालवा वहिनी !

आंगणांत बागशाही जाईजुईचा आनंद
लाल शालीची नणंद !

नांदा भरून अगणीं चिमण्या पाणी पिती
तोंड नणंदुल्या धुती ।

बहीण पित्याची मोठी आली माही आत्याबाई
पदर मोत्याजाई !

माहया बुगडीचे झोक. शेजी म्हणे " आले कोण "
पाहुणे बधु दोन

नदीच्या थडीवरी उतरला कोण राजा
नंदई होये माझा

गांव करोंडी वागेत कोण उतरली राणी
नणद माही मानी !

मोंवद मोठे घर पुढं वसरी तारांची
आंत बैठक सख्याची !

---

## सोडा वाट कृष्णदेवा ! : : २

पाण्याला जाऊं गड्या ! चौघीचे चार दोर
वाटेचा मुशाफर मागे पाणी झारभिर

---

१ लहान नणंदा २ नणंदेचा नवरा ३ सीमेवर ४ माळवद

## सोडा वाट कृष्णदेवा !

पाण्याला जाऊं गड्या ! बाई ! सांगळ्या सांगळ्या !
उन्हानं झळकल्या हातीं तारांच्या बांगड्या !

पाण्याला जाऊं गड्या ! रस्त्यानं वाल्या वाल्या
पहा बुडाला दिवस कृष्णाच्या गाई आल्या

पाण्याला जाऊं गड्या ! धंधुच्या अडावरी
कोण चुनखडी मारी पिंजेच्या नथीवरी !

पाण्याला जाऊं गड्या ! कोण बाई ! अडावरी
राहिली उभी गोरी बाजुबंद लहरा मारी !

पाण्याला जाऊं गड्या ! सख्या एका तोलनीच्या
कालवडी गवळ्यांच्या सुना लेकी मालनींच्या

पाण्याला जाऊं गड्या ! आपण नवत्या नारी
कोण हिरव्या शालूची नटली गोपिका गोरी

पाण्याला जाऊं गड्या ! पाणी भरती बायका
कोणा पाहते राधिका तिच्या मनांत ओळखा

पाण्याला जाऊं गड्या ! हारीनं या उभ्या राहा
जातो नीळकंठ गांवा साज रथाचा ग पहा !

पाण्याला जाऊं गड्या ! अंधाऱ्या वडाखालीं
झरत ओली झाली लाल तिचा तो महालीं !

पाण्याला जाऊं गड्या ! गळ्या सोनियाची सरी
आवळे झाले भारी पडते भुजीवरी !

पाण्याला जाऊं गड्या ! नेम नवा पितांबर
लवे बारिक कंबर चिन्या पडूं दे शंभर !

पाण्याला जाऊं गड्या ! लालपिशवी तारांची
वाटेनं बाई नार कोण्या चालली हौशाची

---

१ सारख्या सारख्या २ अलग अलग

पाण्याला जाऊं गड्या ! चरवी गुंडावर !
हेलकावे, चालूं कशी सांडे पाणी भरभर !
पाण्याला जाऊं गड्या ! पाण्याच्या अडावरी
नको राहूं उभी बाई ! घागर डोईवरी !
पाण्याला जाऊं गड्या ! कृष्ण धरतो पदर
मंदिरांत वाळ तानं ! फार मांडला गजर !
पाण्याला जाऊं गड्या ! पितळी गुंड नवा
झाला उशीर सड्याला सोडा वाट कृष्ण देवा !

---

## यमुनेचं पाणी थोडं : : २

कृष्णाचा जन्म झाला अंधार झमझम !
गोकुळ नगरांत झाल्या विजा चमचम !
कृष्णाचा जन्म झाला वाजे गगनांत टाळ
गर्जे आनंदानं बाई ! सारा गवळी वेटाळ !
कृष्णाचा जन्म झाला वाजे गगनांत भेरी
गवळ्यांच्या वेटाळांत आनंद घरोघरी !
गोकुळ अष्टमीला कृष्णाचा जन्म झाला
पोळा देवकाबाईनं सण आनंदाचा केला
कृष्ण गोकुळांत आला खेळ मांडला नंईंत[1]
येतां जातां राधिकेच्या मागे गळ्याचा ताइंत
मथुरेच्या बाजाराला जातां गौळण एकली
उभा अडवुनी वाट कृष्ण फोडतो दुतली !

* * *

---

१ नदींत

# यमुनेचं पाणी थोडं !

यशोदा माय बाई ! कृष्णाला या सांगा कांहीं
गवळ्याच्या राधिकेचं टाके उचलुनी दही !
यशोदा माय बाई ! कृष्ण तुझा मोठा धीट
गवळ्याच्या राधिकेचा रोखतो कां पाणघाट !
यशोदा माय बाई ! कान्हा तुझा मोठा फंदी
गवळ्यांच्या लेकी सुना कोंडतो कां बागामंदीं !
यशोदा माय बाई ! कृष्णाला या सांग गड्या !
आम्हाला कां रोज बाई ! मागे टोपाच्या बुगड्या !
यशोदे ! कृष्ण कसा आम्हाला हा म्हणे " सखु "
गडे ! ठक तुझा लेक मागे कपाळाचें कुंकू
बाई ! कृष्ण मोठा फंदी खेळ मांडतो ओसरीं
जातां पाण्याला कां बाई ! तोडे गळ्यांतली सरी !
लावतो केशरी गंध कपाळी उभी चिरी !
यशोदा बाई ! उभा कृष्ण राधिकेच्या दारीं !
मांडतो बाळ लीला यशोदे ! तुझा लेक
चळले गोकुळांत लहान मोठे लोक !

* * *

मिषें चेंडवाच्या कृष्ण टाके यमुनेंत उडी
कान्हा बुडाला डोहांत गोकुळांत रडारडी !
पहा डोहांत सावळा अंगाला देतो मोड
काळ्या नागावर उभा पाणी यमुनेंचं थोडं !

---

१ गांवालगतच्या शेतांत

## वेणी घालती हातांनीं : : ४

देव विठोबा मिळून चौघाशी सदा गोड
सांग काहून रुक्मिणी ! मुख तुझे असे जड !
देव विठोबा प्रेमाचा चौघांत बसणेवाला
बोल काहून रुक्मिणी ! असा धरिसी अबोला ?
कशी विठोबाचे शेजी राणी रुक्मिणी बसेना
म्हणे ' अंबीर बुक्याची झाली गर्दी सोसवेना ! "

*   *   *

देवी रुक्मिणी रुसली बसली देउळामागे
देव विठोबा उठोनी स्वत समजावी अंगे
देवी रुक्मिणी रुसली पाय टाकते तळ्यांत !
प्रीतीचे पांडुरंग हात घालिती गळ्यांत
देवी रुक्मिणी रुसली बसली वाळवंटीं !
प्रीतीचे पांडुरंग धरती हनवटी !

*   *   *

देव विठोबा बोलला " रुक्मिणी ! पान आण "
देवी रुक्मिणी बोलली " तुमची जनी कोण "
देव विठोबा बोलला " रुक्मिणी ! कर विडा "
देवी रुक्मिणी बोलली " जनीचा संग सोडा ! "
देव विठोबा बोलला " रुक्मिणी ! सार पाणी "
देवी रुक्मिणी बोलली " बोलवा तुमची जनी "
राजा विठोबा बोलला " उगाळ रुक्मिणी ! गंध "
राणी रुक्मिणी बोलली " सोडा जनाईचा छंद "
बोले रुक्मिणी रागांत विठ्ठला ! कां नाहीं लाज !
सांगा जनीच्या वाड्याला कशाला हो जाता रोज ?

पंढरी बहु लांब !

बोल विठोबा बोलला “ नको गडे ! असे बोलूं
जनी अपंग बिचारी होय आपलें लेकरूं ”

* * *

जनाईचे मायबाप देव विठोबा रुक्मिणी !
तुळशी बिंद्राबनीं वेणी घालती हातांनीं !

---

## पंढरी बहु लांब ! : : : ५

पंढरीला जातां वाटेत मारूती काळा
पाणी सोनियाचं ढाळा !
पंढरीला जातां लाल मारूती साजरा
दोन्ही हातांचा मुजरा !
पंढरीला जातां पहा महादेव उभा
वर देऊळाची शोभा !
पंढरीला जातां नका नेऊं गाडी, घोडे
पाणी चंद्रभागे थोडे !
पंढरीला जातां नका नेऊं मुक्या गाई
पाणी चंद्रभागे नाहीं !
पंढरीला जातां घेतां बरोबर हत्ती
पाणी चंद्रभागे किती ?
पंढरीला जातां जनांच्या मागं मागं
पंढरी डाव्या अंगं !
पंढरीला जातां नाहीं पाहिली अजून
रामेसराच्या बाजूनं !

पंढरीला आतां वाट गवसेना मला
साधु मिळे संगतीला !
पंढरीला आतां मोकळे सोडले केस
घडली एकादस !
पंढरीला आतां मोकळी माझी वेणी
घडले तीर्थ दोनी !
पंढरीला आतां पंढरी किती दूर ?
वाजे वीणा विनीवर !
पंढरीला आतां पंढरी किती कोस
वाजे टाळ बारामास !

* * *

पंढरीला आतां पंढरी बहु लांब
देवाच्या देवळाला सोन्याचे [illegible] खांब !

---

## पंढरपुरांत : : : : ६

बाई पंढरपुरांत विठु राजा लखपती
शेजेर रुखमाबाई केले सोनियाचे हातीं !
बाई ! पंढरपुरांत नांदे विठोबा दयाळ
सोन्याच्या तागडींत मोजे रुक्मिणी गुलाल !
बाई ! पंढरपुरांत कापड्या तो महाराजा
चोळीसाठी रुक्मिणीच्या शिंपी नामदेव आला !
बाई ! पंढरपुरांत कपीला गाय [1]देली

[1] व्याली

# पंढरपुरांत

विठोबाचे जेवणाला दुधाची खीर केली !
बाई ! पंढरपुरांत कपीला गाय एक
आल्या दुधाचा रोजचा विठोबाला अभिषेक !
बाई ! पंढरपुरांत काय्यचा कळा होई
चुडा भरते रुक्मिणी राजा विठु बाकी देई
बाई ! पंढरपुरांत रुक्मिणीला लगबग !
सव्वा खंडीचा घरांत करते मोहन भोग !
बाई ! पंढरपुरांत मोठी रुक्मिणीला घाई !
सवा खंडीची बसून भाजते एकटी लाही
बाई ! पंढरपुरांत पहा सोन्याचे रांजण
चंद्रभागेवर नदी [1]पेती पाणी आनंदानं !
बाई ! पंढरपुरांत विठोबा हलवाई !
सोन्याच्या तागडीनं मोजे पेढे रुक्माबाई !
बाई ! पंढरपुरांत विठोबा बुकेकरी !
राणी रुक्मिणी कपाळीं केते कुंकवाची चिरी
बाई ! पंढरपुरांत पहा विठोबाचे तळें !
सोन्याचं सीताफळ पाण्याच्या वरती खेळे !
बाई ! पंढरपुरांत झाली विठोबाला रात
पाहते रुक्मिणी वाट कमानीदरवाज्यांत !
बाई ! पंढरपुरांत लेते सरस्वती मोती
लेते रुक्माबाई कुंकू दोघींचा कां एक पती ?
बाई ! पंढरपुरांत रुक्माबाईची रांधणी
चला जाऊ बाई पाहूं कशी कांचेची बांधणी
काळ रुक्मिणीची साडी पहा पुण्याचं गादली

१ पिती २ स्वयंपाकघर ३ कराव झाली

बाई ! पंढरपुरांत देव सोडतो चमेली !
बाई ! पंढरपुरांत मारूती कोसावाणो
भरून झारी रोज गणेश नेतो पाणी !
बाई ! पंढरपुरांत अबीर बुक्याचे पेव
कंठी माळ हातीं विणा पायरीला नामदेव
बाई ! पंढरपुरांत वारा मंजुळ सुटला
पुसते रुक्मिणी शेला "देवा ! कशानं फाटला ? ".
बाई ! पंढरपुरांत पाऊस बरसला !
पुसते रुक्मिणी शेला "देवा ! कसा झाला ओला !"
रोज विठोबाची माडी येगे रुक्मिणी दमानें
कशी वरून हातानें छत्री धरली नाम्यानें !
बाई ! पंढरपुरांत साधु संताचा शेजार
तुळसीच्या ओट्यावर नित नामाचं गजर !

---

## सीता गेली वनवासा : : : ७

जाते सिता वनवासा करते विचार मनीं
माझ्या हातची निंबोणी टांकल कोण पाणी ?
जाते सिताबाई वना म्हणती आयाबाया
"नाहीं रामराया माया पोटी गरभाची छाया"
सांगे सीता जातां वनीं सेवभारं[1] तेलिणीला
"तेल पुरव तिळाचं रामाच्या समईला"
जाते सीताबाई वना सेवभार बहिणीला

---

१ सेवाभार; निरवानिरव

# सीता गेली वनवासा !

" धुओ हलक्या हातांनी        रामाचा रेशमी शेला "
जाते सीताबाई वना        सेवभार बारिणीला
" पानं पुरव पिकले        रोज रामाचे विड्याला "
जाते सीताबाई वना        सेवभार माळिणीला
" फुलं पुरव कवळे        माझ्या रामाचे पूजेला "
जाते सीता वनवासा        रथ चाले थिर थिर !
सीता बसली रथांत        लक्षीमण बरोबर !
" भाऊजी लक्षीमणा !        ठेवा रथ जरा उभा "
म्हणे सीता " विसरली        घरीं कुंकवाचा डबा "
भाऊजी करा उभा        रथ जरा तळ्यावर !
विसरली पितांबर        रामाच्या शेजेवर !
भाऊजी करा उभा        रथ जरा वाकूवर
रामाच्या शेजेवर        राहिला रत्नहार !
भाऊजी लक्षुमना !        काय पोटीं आडी गुडी
माहेरची वाट बाई !        पुसतां कां घडी घडी ?
भाऊजी लक्षुमना !        पोटीं तुमच्या कपट
नोहे माहेरची वाट        वन धावंडा बेफाट !

*        *        *

भयाण वनामदी        होतें तातोबाचें घर [2]
होती सीताबाई हातीं        वाळवत तिथं चीरें [3] !
सीतेला वनवास        अंकुश बाळ ताना
केला गवती पाळणा        आंत निजवला राणा !
सीतेला वनवास        बाळ दोन्ही डाव्या कुशीं
केली गोव्याची उपशी        लागे झोप रोज कशीं ?

१ वृक्षविशेष        २ वाल्मीकीचें        ३ वस्त्र

लहु अंकुश सीतेच्या आले पोटीं हिरे दोघ
केळा रवंदळ त्यामी रामाचा फुलबाग !
बागबाणीन बोलली " सुखी रामराजा घरीं
कोण बागवानावरी कोपला बाई ! वैरी ! "

*   *   *

हरिकथा सांगे सीता वर्नी आपल्या कर्मांची
राम नगरांत पोथी लावतो देवा धर्माची !
बारा दिसांचे बाळंत गेली सिता धुवायाले
कशी बाई ! एकाएकी पुढे वाघा वानराले !
साठ शंभर वानर रामाचें पायदळ
सीताबाईला वनांत आले बाई कसें मूळ !
साठ शंभर वानर सेना रामाची शीर्वंदी
नेली मिरवत राणी नगरांत मेण्यामंदी !

---

## झाले सारे रातोराती : : : ८

आला चंद्रभागे पूर दाटे पाणी दोन्ही थड्या !
चालला पुरांत पहा मारे पुंडलीक बुड्या !
आला चंद्रभागे पूर वाहिलें पंढरपूर
सोन्याच्या विटेवर उभे विठोबाचें घर !
आला चंद्रभागे पूर पाणी मारते उकळ्या
लावल्या जागोजागीं कोणीं सोन्याच्या साखळ्या !
आला चंद्रभागे पूर पहा थकीथकी लोक
बाई नवल पाण्यांत उभे देव पुंडलीक !

# झाले सारे रातोराती

आला चंद्रभागे पूर : पाणी शिराले गांवांत,
हातीं घेऊन सांगड देव चालला धांवत !
आला चंद्रभागे पूर पळे पाणी रानोवना
टेकलं बाभुळवना मधे कृष्णाचा पाळणा !
आला चंद्रभागे पूर कोंडल्या मुक्या गाई !
दया येऊ द्या विठ्ठला ! तान्ह्या लेकराच्या आई !
आला चंद्रभागे पूर पाणी मोठं थंडगार ?
भर हिवाळ्यांत माझी न्हाते काशी दशाहार !
आला चंद्रभागे पूर पाणी टेकलं निंबाला
देव विठ्ठल टेकून उभा गरुड खांबाला !
आला चंद्रभागे पूर नदी चालली भरून
निंबू टाकला मारून गेले पाणी उतरून !
आला चंद्रभागे पूर टेके पाणी आजणाला
उभी राहून काठाला मारे हांक साजणाला !
आला चंद्रभागे पूर वाहे पाणी तुपावाणी
वाटेचा चाल्णकार पाहते का वेड्यावाणी !

* * *

आला चंद्रभागे पूर नेली खरडून रेती !
देव रुक्मिणी गरुड झाले सारे रातोराती !

---

१ अंजनवृक्षाला २ निघूनजाणें

## जळे लंका रावणाची ! : : : ९

जातां राम वनवासा नाहीं सिता लेली कुंकू
येतांना रामाची फेरी ह्मणे " मला नका टाकूं "
जातां राम वनवासा सीता पाहते आंतून
डोळ्यांच्या पातणीनं घेई राम बोलावून !
गेले राम वनवासा राणी सीता बरोबर
दोघांच्या सेवेसाठी लक्ष्मीमणजी तयार !
राम लक्षीमण सीता तिघे चालले वाटेनं
येतां रामराया घाम पुसे सीता पदरानं !
गेली सीता वनवासा केली दगडाची उशी
दाट भयाण वनांत लागे झोप तिला कशी ?
गेली सीता वनवासा तणाचं आंथरूण
भयाण जंगलांत लागे झोप वैनागान
वनाचे वनफळं बाई ! सीता होती खात
पानांच्या विड्यामंदी रामराया होती देत
सासु कैकइने केले हात लावतांच कडू !
मनीं वैतागली सीता गेली वैताग वाड्याले
लागो आग पाप्या तुझ्या ! उभ्या रंगीत माडीले
सीतेला वनवास नाही बोलायाला कोणी
मायबहिणी वनांत बोरी बाभळी साजणी !
सीतेला वनवास सासु कैकइनं केला
रामाच्या रामटेकीं बरड धुपावला !
सोसला वनवास जिवावरी सीताबाई !
कसा रामासंग जोडा राज भोगूं दिला नाही !

* * *

## गुरुपूजा

गेले राम शिकारीला — हातीं शिकार लागली
घरी जोग्याच्या मिषानं — फेरी रावणाची आली ।
रामाच्या रामटेकीं — वाजे घटा घणघण
धांवा रामा ! जोडा बाण — सीता आले रावण !
रामाची राणी सीता — कशी रावणान नेली
गळ्यांतला रत्नहार — मोती उणारीत[1] गेली !

* * *

सीतेला वनवास — असातसा नाही झाला
बोरी बाभळीचा पाला — नाहीं सीतेला पुरला !
सीतेला वनवास — झाला जरी बाई ! बहू
अवघ्या जगामधी — वाटे कसा गहू गहू !
सीतेला वनवास — रोज लोखंडाचे घण
आले सीतेला म्हणून — आज मोठं देवपण !
सांगे सीता वनी कथा — बाई ! आपल्या कर्माची !
जळे लका एकाएकी — कशी पाप्या रावणाची !

---

## गुरुपूजा : : : १०

गुरुचा उपदेश — झाला मोठ्याच्या कन्येला
राज्याचा त्याग केला — अनुभव कळूं आला !
गुरुची गुरुपूजा — रेशमी धोतरजोडी
नाहीं कुबळीला बळ — म्हणुनी मी हात जोडी !

१ पेरीत, फेकीत

गुरुची गुरुपूजा तबकांत शालजोडी
दक्षिणा दिली वाडी मला दर्शनाची गोडी !
गुरुची गुरुपूजा मजला नाहीं बळ
माझ्या गुरुच्या चरणीं वाहीन मी गंगाजळ !
गुरुची गुरुपूजा मजला नाहीं बळ
माझ्या गुरुच्या चरणीं वाहीन तुळसदिळ !
गुरुची गुरुपूजा एक तुळसीच पान
दासी खुबली भरुन करते मनांत ध्यान !
गुरुमस्तकी वाहिली तुळशीची ही मजुळी
गुरुमहाराजा ! माही ज्ञानदृष्टि उजळली !
गुरुच्या कीर्तनाला झाली बाई ! मला घाई
करतां गुरुची पूजा झाला नमस्कार नाही !
वाजे सोन्याचे खडाऊ आत्मबोधाचे ते ठसे !
माझ्या गुरुबावाजींचं रूप चालतांना दिसे
कसे सोन्याचे खडाऊ शांतीचे शोभते स्थळ
माझ्या गुरुबावाजींचं चालणं मोठ स्थिर !
पायीं सोन्याचे खडाऊ क्षमादयेचे ते मोती
गुरुबावाजींचं माझ्या चालणं गं गजगती !
पायीं सोन्याचे खडाऊ काय वैराग्याचे रवे ?
चालतां गुरुजी माहे वीज आगाशी गं ! लवे !
भिऱ्या सोन्याचे खडाऊ मोत्याचे त्याला घोस
गुरुबावाजींचं माझ्या कसं चालणं राजस !
गुरुरायाचे भेटीला एकली मी कशी जाऊं ?
गुरुहीण भावाची काय बरोबर नेऊं ?

| | |
|---|---|
| गुरुमहाराज माझे | इथून ते दूरदेशीं |
| लक्ष दुबळ्या दासीच | नित त्यांच्या पायापाशीं ! |
| गुरुमहाराज माझे | इथून ग ! बारा कोस ! |
| करते मी हृदयांत | दासी अहोरात्र ध्यास ! |

---

## कुठं उचलला मठ ? : : ११

एकांती नगरांत जप करत बसला

गुरु त्याला म्हणा भला !

झुडा गोसाव्यांच्या बाई ! जाऊ द्याना जाते तरी

गुरु उतरवा घरी।

आले गुरुजी नगरा डोले हरी गती गती

दक्षिणा झाली किती ?

येतील गुरुजी घरा पाय धुईन ताटांत

तीर्थ घेईन मुखांत ?

पाट चंदनाचे घरीं टाकले हारोहारीं

गुरू बसले वसरीं

सुती बारिक सेवया आधणी झाल्या लाह्या !

केले ताट गुरुराया !

कसे साळीचे तांदुळ पांढरे मोती छान

भात मोकळा शिजून !

पाट चंदनाचे बाई ! भिंतीशी उभे केले

गुरु बाबाजी जेवले !

चांदीचे पानदान सोन्याचा अडकित्ता

शिणे गुरू विडे घेतां !

गोड गुरुजींचे नाव पडो माझ्या सदा कानीं
कस विसरू बहिणी !

ठेवला चरणी माथा बाई ! स्या येतां जातां
दयाळ गे ! गुरू मोठा !

वाहिला पार्यी माथा भाव मनांत ठेवून
गुरू दयाळ म्हणून !

माथा ठेवता नेटून जाते गुरुच्या कृपेन
सार दरिद्र फिटून !

दिला गुरुबावाजींन नको फेकू मत्र एक
पुजाण्यामधी[1] राख !

दिले गुरुबावाजींन नको फेकू मत्र दोन
उकड्यामधी शेण !

चला बाई ! जाऊ पाहू गुरुजींची बागशाही
आसना ख्याली जाई !

*　　　*　　　*

सांगती गुरुची विद्या बाई ! मोठी बळकट !
जाई राणीच्या सकट कुठं उचलला मठ ?[2]

---

## देवाच्या देउळांत : : : १२

देवाच्या देउळांत दिवा जळतो लोण्याचा !
आत सदुक सोन्याचा !

देवाच्या देउळांत फुलांचे सडगाण[2] !
रोज हरीचं कीर्तन !

देवाच्या देउळांत देव नकशीचा उभा !
रंगाची लाल शोभा !

1 केरांत 2 पखरण

## देवाच्या देउळांत

देवाच्या देउळांत गोड साखरेची पुडी !
जळे कापराची वडी !
देवाच्या देउळांत नदीला शेला लाल !
करा नवस कबूल !
देवाच्या देउळात पुत्रांची लोटालोटी
मागा कृष्ण लाल पोटीं
देवाच्या देउळांत पुत्राची काय वाण ?
मागा कन्या आवडीन
देवाच्या देउळांत देवाला घाला माळ
मागा पोटीं तान्हे बाळ !
देवाच्या देउळांत रोज चढते पायरी
भामा मागते माहेरीं !
देवाच्या देउळांत लेक जवळ शेजीची
तुळस लावणीची !
देवाच्या देउळांत कव्हाचो[1] उभो राहे
डोळे उघडोनी पाहे !
देवाच्या देउळांत झाली बाई मोठी दाटी
शालीची करा ओटी !
देवाच्या देउळात बोलते कोण " देवा
लाव हवेलीत दिवा "

* * *

देवाच्या देउळांत नको जाऊ कधी सडी[2] !
भावाचा घे बाळ कडी[3] !

---

१ केव्हाची २ एकटी ३ कडेवर

## उगवला नारायण ! : : : १३

उगवला नारायण लाल शेंदराच्या खापा[1]
फुले अंगणांत चाफा
उगवला नारायण पहा झाडाझुडावरी
तेज पडे चुड्यावरी !
उगवला नारायण गाडीचें कां गोल चाक ?
पिरथमी[3] नऊलाख
उगवला नारायण करे कमा लखलख
झाडते हा मैना पख !
उगवला नारायग रोज उगवतां पहा
हार्तीं बेलफुलें वहा
उगवला नारायण आभाळ भडक लाल
काय झोकला गुलाल ?
उगवला नारायण जळते तांबडी ज्योत
आला लहरा मारत !
उगवला नारायण बाई ! चन्द्रम्याची कीर
कुंकु लाल अणीदार
उगवला नारायण अगनीचा कां पुडका ?
आंत मोत्याच्या सडका !
उगवला नारायण आला पहाड फोडून
दिले सुरुंग सोडून !
उगवला नारायण पहा उजेड दुरून
लाल भडके अगीन

---

१ चिपा; लांब तुकडे  २ पृथ्वि

उगवला नारायण सारी उजळे दुनिया
किती लावतां समया ?
उगवंला नारायण तिरीप पिवळी छान
हासते हिरवें रान
उगवला नारायण तुहा रानदेवी ! पती
हातीं ओवाळ आरती

---

## पाणी वरून पडतें : : : १४

पाणी वरून पडतें जमिनी गेल्या वागा
पावळे पेरू लागा
पाणी वरून पडतें जमीन शिणारते
मोती हिरे उणारते !
पाणी वरून पडतें पडते उभ्या धारा
तिफणी आल्या घरा
पाणी वरून पडतें गर्जून गर्जून मेघा
सखा झाडाखालीं उभा !
पाणी वरून पडतें टपकतें थेंब थेंब !
करे झाडंझुडं चिंब
पाणी परून पडतें लहरा मारे मुंग
झोंवे पानोपानीं शेंग !
पाणी वरून पडतें बाजरा निसवला
दाणा चिकावर आला
पाणी वरून पडतें तूर बारावर आली
वागल्या फांद्या खालीं

---

१ सरत्यांतून ( वेंळवाची पेरण्याची पुंगळी ) दाणे सोडणें

पाणी वरून पडते डोले धांडा उसावाणी
काढ जसा नागफणी !
पाणी वरून पडतें धरे मिरची फुलोरा
भरारला मोतीचुरा !
पाणी वरून पडतें नार चालली वावरा
हातीं तिच्या विळा दोरा !
पाणी वरून पडतें कसा मोत्यांचा शिरवा
बाग सम्याचा हिरवा !
पाणी वरून पडतें काय पाहतां वावरा
धरा धडाल डवरा !
पाणी वरून पडतें बसे दडून हरणी
झाली मुकी मैनाराणी !
पाणी वरून पडतें पहा म्हशी डोबोडोबीं
गवळी उभा लोभी !
पाणी वरून पडतें मोत्यांचा झाराझुरा
जाते पाणी देवघरा !
पाणी वरून पडतें नदी दोथडी भरून
धार चालली फुटून !
पाणी वरून पडतें भिजला महादेव
झांके पारबती शेव !

---

## सकाळच्या पाहरीं : : : ५

सकाळच्या पाहरी सड्याची अंगणीं शोभा
तुळसी खालीं राही सावळा राम उभा !

# सकाळच्या पाहरीं

सकळच्या पाहरी मारवणाची कां घाई ?
राम रथांत बसून लकेला सारहोई[1]
सकाळच्या पाहरी जोडा हात सूर्यबाणा
म्हणा "चुडियाला माझ्या यशा दे गा ! नारायणा ! "
सकाळच्या पाहरी उठा काम धदा करा
दिली पित्याजीन गाय हाती शेणपाट्या भरा
सकाळच्या पाहरी झाला उशीर सड्याला
सगे सख्याच्या मोवती आले पानांच्या विड्याला !
सकाळच्या पाहरी तिरपि सादी भिंती
ऊठ ऊठ सूनबाई ! भाग्याचे भागीरथी !
सकाळच्या पाहरी सख्यान कां केली घाई ?
हातमुडा शाल नवी भरजरी लावे डोई !
सकाळच्या पाहरी सखा उठवी गड्याला
झाला उशीर सड्याला धाडे पखाली पाण्याला !
सकाळच्या पाहरी वेशीला गेले लोट !
धुतले सख्यान आंग भिजला अगणीं पाट !
सकाळच्या पाहरी भरली हिरवी साडी !
लाडाच्या मैनाईला आधण द्या घोडे गाडी !
सकाळच्या पाहरीं रोज दळाचा[2] गजर !
मायबाई ! गवळ्यांचा मला भोवती शेजार !
सकाळच्या पाहरीं रई[3] फिरते डेऱ्यांत
डोळ डोलते गौळण दोर घेऊनी हातांत !
सकाळच्या पाहरी मुख पाहते गाईचें

---

१ बिदा होई २ दळण्याचा ३ रवि

अंगणीं ब्रिंदाबन शोभे तुळसी माईचे !
सकाळच्या पाहरी टाक सडा चंदनाचा
खेळ खेळता अंगणी पडे पाय लाडक्याचा !
सकाळच्या पाहरी सत्य बोलावं नेमाच
नका पाडू खोटं कधी गुरुवचन मोलाचं !
सकाळच्या पाहरी नाहीं टळू द्यावा नेम
आधीं मुखी रामनाम करा मग घरकाम !

---

## पाहे वाट गोविंदाची : : : १६

नागपचमी नागाची कर पूजा वारुळाची
येतां आठवी बधुची पूज कोर चांदोबाची
सण पोळयाचे दिवशी राहे ककडीला मान
साळा वधतो जावई करे[1] सजीव बहीण !
सण पोळयाचे दिवशीं माडी नेमून मोराची
पूज दारांत देराची जोडी नवीन मानाची !
सण पोळयाचे दिवशीं मातीचे वाडबैल[2]
बांध कागदी बाशिंग गुंफ बनातीचे चौर
सण पोळयाचे दिवशीं मोठी बैलांची दाटण
चाल रस्त्यांत पाहून साडी फाटल नवीन

---

१ करते २ लहान बैल

सण दसऱ्याचे दिसी — टाक सडा चंदनाचा
अंगणांत बांधवाचा — पूज घोडा राघवाचा
सण दसऱ्याचे दिसी — गेले भाऊ शिलंगणा
घरी बहीण यमुना — चौक भरते अंगणा
बाई सणामधे सण — भाऊबीज आनंदाची
घेण्या तबकात मोती — पाहे वाट गोविंदाची !

---

## लाल महालाचा दिवा ! : : : १७

घेतो भाऊ लाल साडी — लावी रुदीला पाहून
जवळ करी मोल — बहीण बोलावून
ताठ्याच्या पालामधी— — उभी मायबाई कोण
रुपायाचा जरीखण — फाडला एकलीनं
ताठ्याच्या पालामधी — मायबाई करे मोल
धुण्यान फाटे चोळी — वाटे ताठ्याला नवल
ताठ्या सौदागरा ! जरा — भावाशी माझ्या बोल
कर लुगड्याचे मोल — घडी साडीची उकल !
ताठ्याच्या पालामधी — रंगीत साड्या दोन
भावाला दुघडपण[1] — नाही लोटत हें मन
बहीणीचं तणघर — भावाची मोठी माडी
नांदे कशी एका गांवीं — बहीण भावाची जोडी !
भाऊ होय तो आपला — भावजय पराव्याची !

१ परकेपण

गोताची खरी भामी — लेक मव्या बांधवाची '
भावजय अबोल्यान — काय गोडी घरी दारी
सखा भेटता वाटेत — डोळे पुसते पदरी
लेकाचा का घेते कडी — धरते लेकीचा हाती
लेकाच्या लेकराची — मायेला का आशा मोठी '

दूर लेकीचे लेकरं — जसा पडरीचा पोवा' !
प्यार लेकाचे लेकरं — लाल महालाचा दिवा !

---

## केलें दान जाते वाया ! : : १८

लेकुरवाळया लेकी — सुना वर्गे झाल्या दुया '
पाण्याला अडा गात्या — मंडप देर² पिण्या
भाऊबिजेच्या दिवशी — वेण्या तवकात मोती
हाती ओवाळीन होती — माझे वहिनीचे पती
भाऊबिजेच्या दिवशी — चंद्रसूर्य दोघे भासे
वाट पाहतील घरी — मागतील अनरसे '
उठा उठा वेगा बाई ! — गडे ! झाडू द्या वसरी
रंगु भाग्याची बसली — आली पाहुणीन घरा
उठा उठा बेगी बाई ! — झाडू द्याना घरदार
आहे काचाच्या पलंगी — निजून माहा देर !
माह्या वहिनीचे पती — घामाने गर्द झाले
टाका अंगणी पलंग — लावा जाळी माडवाले

१ यात्रेकरूचा मेळा, २ दवर = दर — दीर

## भावांनीं वहिणी नेल्या

रोज अंगण झाडते झाडते मी पसाऱ्याचे !
खेळे इकडे तिकडे बाळ माझ्या भासऱ्याचे !
रोज अंगण झाडते बाई ! झाडते रुंदीचें
पडे कैचण कचरा बाळ खेळते बंधुचें
भाऊ करतो सोयरा नात तुही सून माही
वागवीन फुलावानी नको म्हणूं पित्या " नाहीं "
भाऊ करतो इवाही[1] म्हणे बाप " नाहीं बाई !
आटाची भावजई मान राखणार नाहीं "
भाऊ करता इवाही लागे सून भासी पाया
केलें दान सारे बाई ! जाते एकाएकी वाया !

---

## भावांनीं वहिणी नेल्या . १०

माझ्या दाराहुनी गेली लाल लुगड्याची
डवीं हातीं चुगड्याची !
माझ्या दाराहुनी गेली जरीपातळाची
माळ गळा पुतळ्याची
माझ्या दाराहुनी गेला कोण चंगीभगी
पागोटी पचरंगी
माझ्या दाराहुनी गेला एक सरदार
कंठी त्याच्या मोतीहार !
माझ्या दाराहुनी पाढरा गेला घोडा
दोस्त्यांचा झाला सडा !
माझ्या दाराहुनी कळप राघोचे गेले

---

१ व्याही

### रंग हिरवा चोळीले[1] !

माझ्या दाराहुनी गेला कोण झडक्याचा[2]
हातीं रुमाल जरीचा ?
माझ्या दाराहुनी गेले हत्ती बारा तेरा
कोण्या साहेबाचा डेरा ?
माझ्या दाराहुनी गेले लाल घोडे पांच
काय कंचणीचा नाच ?
माझ्या दाराहुनी दुधाचे लोट गेले
गुरुजी न्हाणीयेले
माझ्या दाराहुनी रंगीत गाड्या गेल्या
भावांनीं बहिणी नेल्या !

---

## बाळ पोटीं सामावला ! : : २०

महालांत सुलकेच्या रातीं आला रातीं गेला
कोण नीळकंठ राजा नाहीं ठाऊक कोणाला !
कन्या राजाची सुलका येतां डोळे तडफडे !
टाके नीळकंठ फासा डाव मनाजोगा पडे
राजा नीळकंठ बाई ! रातची करे चोरी
नाहीं सुलका बाईला ठेवली उजागरी !
दोन पहार अंमल साऱ्या नगरीला झोप
राजा नीळकंठ रातीं मारे कवाडाला थाप !
नाहीं ठाऊक कोठून करीं येणें रातोरात
कसा चुकवुनी डोळा प्रगटतो महालांत

---

१ चोळीला २ नांकझोक केलेला

कन्या राजाची लाडकी बोले त्यास "आता शाही !
ठेवा हाताची मुद्रिका निशाणी म्हूण कांहीं"

* * *

राजा नीलकंठ गेला नाहीं फिरून तो आला !
घात मुलकेचा झाला बाळ पोटीं सामावला !

---

## नेलें अशुद्ध डोण्यांत ! : : २१

भरल्या नगरांत रंगीत साड्या बहू
नको चाळ्याच्या दुकानीं शेंदरी लाल घेऊं
जोवरी मायबाप तोवरी माही सत्ता
साडी उकलतां मागं नको पाहू समरथा[1] !
जेवढी[2] मायबाप तेवढी[3] साडी चोळी
नाहीं पुसत फुकट मागं भाऊ भावजई !
दिवाळीची साडी चोळी नको आशा माही मोडूं
सक्रांतीचा तीळ लाडु नको माही माया तोडूं
जातां भाऊजी बाजारा मारे भावजय हाका
" भारी मोलाचं सणंग खुणावते घेऊं नका "
घेते बंधु बाई ! साडी भावजय अबोल्यानं
उकलतो गं पदर भावाच्या मी मुलाज्यानं !
घेतो बंधु लाल साडी डोळा भावजय मोडी !
पिता येतवरी चाळ्या ! उकलूं नको घडी

---

१ समर्था २ जोवरी ३ तोवरी

जेवढी मायबाप तेवढी येण जाणं
भावजईचे पासून झाला भाऊ बेइमान !
म्हणे बहीण भावाला " आण शालु जरीकाठी "
बोले भावजय " काल गांवाला गेले चाटी ! "
भाऊ म्हणते उदड " पान बहिणाई खाऊं "
बोलल्या वहिनीबाई " सुपारी कुठं पाहू "?
भाऊ बोलावे जवळ बोले " बस माझ्या ताटीं "
बोलल्या वहिनी आंत " सारी मोय माझ्या हातीं "
भाऊ म्हुणावें डोळ्यांनीं " वाढ बहिणीला पोळी "
बोले वहिनी आंतून " केली मोहाची पानोळी[1] "
माहे सांगती भाऊजी " करा बहिणीला भात "
बोले भावजय माही " कण्या वरल्या[2] गर्जीत[3] !
म्हणे भाऊ सोनाराला " सल्ले[4] घडव सोनेरी "
बोले रागांत वहिनी " करा लेकरे भिकारी ! "
करे बंधु सार[6] मला बाई लोकांचे खासरीं[5] !
मानाची भावजई राने बसून वसरी[7] !
भावाला झाल्या पोरी पोरीची लागे गोडी
आशा बहिणीची थोडी वाट माहेराची मोडी !
जाता बहिणीच्या गांवा पडे वेट[8] छकड्याचा !
निघतां लेकीच्या गांवा खोगीर रेशमाचा !

* * *

कशी भावानं बहीण वधली कूपकाटीं
राग मावला न पोटीं अस्तुरीचे बोलासाठीं

१ भाकर २ वैरल्या ३ भांड्यांत ४ मुदी, अंगठी
५ खाचर, बंडी ६ विदा ७ ओसरी ८ धाव

## मोठ्याचा नवरदेव

पहा बहीण पाठची भाऊ वधतो वनांत !
मारुती झाला लाल ! नेले अशुद्ध टोण्यात !

---

## मोठ्याचा नवरदेव ! : : २२

मोठ्याचा नवरदेव मिरवे अबदागिरी ।
पिवळा नग्नवोटी मोती बार्शिगाला शिरी !
मोठ्याचा नवरदेव रार्शी निघाला शिळाणी[1]
रुपाय। ओवाळणी हार्ती घालती बहिणी !
मोठ्याचा नवरदेव परणू गेला दूर
मेण्याला भोई बारा हार्ती सोनेरी कट्यार !
मोठ्याचा नवरदेव चढू मुलुखात ठसा
पान झाडीतून कसा चमकला अमरसा[2] !
मोठ्याचा नवरदेव चालला धडक्यान
मागे गाडी घोडे हत्ती पुढे फडके निशाण !
मोठ्याचा नवरदेव ढाळिती शिरी चौरी
फुलझाडं डोलकाठ्या महाराच्या डोईवरी !
मोठ्याचा नवरदेव रूप त्याचे त्याला दंडे
कसे दुरून दिसते लाल मांडवाचे झेंडे
मोठ्याचा नवरदेव बाई ! घरचा पाटील
गोफ गळ्यांत सोन्याचा डोई जरीचा मंदील !

१ थंडवेळेला २ एकप्रकारचा दागिना

| | |
|---|---|
| मोठ्याचा नवरदेव | कसा रातचा निघाला |
| हातीं मशाल म्हाल्याच्या | लख्ख उजेड पडला ! |
| मोठ्याचा नवरदेव | मुलुखांत अगाजला ! |
| धुंडा हातांत नगदी | परणू दूर गेला ! |
| मोठ्याचा नवरदेव | पहा बाई ! थाट त्याचा |
| लेली नवरी गहिना[1] | कसा निच्या जडावाचा ! |
| मोठ्याचा नवरदेव | नाही येंगत[2] पायरी |
| हसे आपल्या मानाला | कंठी मागते सोनेरी ! |

---

## नार पुत्रानं भाग्यवंत ! : : २३

देवाला मागते मागते न सोन-नाणं
कन्यापुत्र पोटीं दोन
देवाला मागते पोटीं पूत विसाव्याला
पाठीं बंधु भूषणाला !
देवाला मागते पाठ पोट बरोबर
नाहीं मागत उबार[4]
देवाला मागते बाई ! आवडीचे दोघ
मधे चुनडीची रेघ !
देवाला मागते संपत थोडी बहू
पोटीं पुत्र पाठीं भाऊ
देवाला मागते संपत थोडी थोडी
भीमा अर्जुनाची जोडी

---

१ दागिना २ वेंघत ३ विसाव्याला ४ जास्त

## कोणी पाहिला सुखांत

देवाला मागते  बंधुला पोटजन
जावळे उतरीन
देवाला मागते  मागते न घोडी गाडी
आवता जोगे गडी!
देवाला मागते  घरीं सपनीला सोनं
बाळ विश्रांतीला तानं!
देवाला मागते  रोज दळण्या जवारी
बाळ खेळण्याला घरीं!
देवाला मागते  पांचा पुत्रांची पगत
भोळ्या राजाची संगत!

*  *  *

देवाचा देवपाट  फुलानं शोभिवंत
नार पुत्रानं भाग्यवंत!

---

## कोणी पाहिला सुखांत ?  :  :  २४

दोघ्या नारींचा पुरुष  करते विचार मनीं
कोणाला मागू पाणी!
दोघ्या नारींचा पुरुष  अंगणांत वनवासी
रोज पलंगी उपाशी!
दोघ्या नारींचा पुरुष दुहेरी बोली बोले!
आगाशीं[1] सूर्या डोले!
दोघ्या नारींचा पुरुष  नागी हौसीगुणं केल्या
शेंदऱ्या[2] जड गेल्या!

---

१ आकाशीं  २ लुगड्याचा एक प्रकार

दोघ्या नारींचा पुरुष केल्या कशा विस्ताराला
भाव दुजा लुगड्याला !
दोघ्या नारींचा पुरुष रोज घरांत झगडा
ऐक बाभळीचे खोडा !
दोघ्या नारींचा पुरुष झाला सर्प पानबुड्या
हिंडे सदा दोन्ही थड्या !
दोघ्या नारींचा पुरुष वाळून खांब जोगी
एकली राजभोगी !
दोघ्या नारींचा पुरुष बसे रास्त वसरी
चाललं कीर्तन घरीं !
दोघ्या नारींचा पुरुष लागे पिंपळाला कीड
वाळून झाला खोड !
दोघ्या नारींचा पुरुष केल्या नारी कौतुकानं
झाला जोगी वैतागानं !

*　　　*　　　*

टाकने कां एक पाणी उगाळते एक गंध
कोणी पाहिला सुखांत काय दोघींचा गोविंद ?

---

## करे नार येरझारा ! : : : २५

सोनाराचे घरीं बसून कोणाची आजी ?
सोनं तागडीनं मोजी
सोनाराचे घरीं बसला कोणाचा बाप ?
टाकला सोनेरी गोफ

## जिलबी तार तोडे

सोनाराचे घरीं   माउली कोणाची काशी ?
घडवते टीक ठुशी
सोनाराचे घरीं   बसून कोणाचा दीर
लावे कर्णफुला घेर !
सोनाराचे घरीं   कोण्या साजणीचा पती
लावे नथणीला मोती !
सोनाराचे घरीं   कोण रंगेल छबेला
घडवते काकणाला
सोनाराचे घरीं   कोण म्हणे “ रत्नचुडा
दुहेरी या कल्प ? जोडा ”
सोनाराचे घरीं   कोण सखा पाठमोरा
करे नार येरझारा !

---

## जिलबी तार तोडे ! : : : २६

मागे बाळ कृष्ण जेऊं   खव्याचे गोड पेढे
खडीसाखरेचे खडे
मागे बाळ कृष्ण जेऊं   तिळासाखरेचे लाडु
बत्तासे किती फोडूं ?
मागे बाळ कृष्ण जेऊं   करंजी अनरसे
पापड झाले खासे !
मागे बाळ कृष्ण जेऊं   तूप पुरणाची पोळी
दूध लेवया सुतळी[1] !

---

१ सुतासारख्या बारीक

मागे बाळ कृष्ण जेऊं    गरम सांज्याची पोळी
भात मोगऱ्याची कळी !
मागे बाळ कृष्ण जेऊं    ताकाची सुरस कढी
तळली कुरवडी !
मागे बाळ कृष्ण जेऊं    तेला भरली साटोडी
केली उत्तम पाटोडी !
मागे बाळ कृष्ण जेऊं    केळाचें कालवण
वर दुपोडीचं[1] पान !
मागे बाळ कृष्ण जेऊं    मुंगाचे मुंगवडे
जिलबी तार तोडे !

---

## माहेरा गेली राणी !  :  :  :  २७

चिकण सुपारी    कोण धडाभर घेते
बाई ! कोणा पुरवते ?
चिकण सुपारी    केर पासरी वजन
कोण्या नारीचा सजण ?
चिकण सुपारी    अडकित्ता बाराफोडी
माया पुरुपाला थोडी !
चिकण सुपारी    खाण्याची मोठी गोडी
जात अस्तुरीची वेडी !
चिकण सुपारी    निवड गा ! वाणी दादा !
घरीं बाळंतीण राधा !

---

१ दुपोडी पाळीचें

चिकण सुपारी निवड तूं वाणी भाऊ !
आली पाहुणीण जाऊ
चिकण सुपारी कशी खिशांत दाटली
नार रस्त्यांत भेटली !
चिकण सुपारी खिशाला डाग लाल
सुना पडला महाल !
चिकण सुपारी भरे खिसा काठोकाठ
पाहे सजणीची वाट !
चिकण सुपारी खिशांत झाली जुनी
माहेरा गेली राणी !

---

## झाल्या तिन्ही सांजा ! : : २८

झाल्या तिन्ही सांजा लक्षुमीचा डामडौल !
वाडा गवळ्याचा खोल !
झाल्या तिन्ही सांजा लाव दिवा राई बाई !
बांधते गायकी गाई
झाल्या तिन्ही सांजा सांजी सरसा ग ! दिवा
तुळसीच्या पुढे ठेवा
झाल्या तिन्ही सांजा लाव दिवा लगबग
जोड्यानें देव दोघं
झाल्या तिन्ही सांजा आले नंदी डुकरत
माझ्या काशीची दौलत !

झाल्या तिन्ही सांजा लाव दिवा मायबाई !
घरीं लक्ष्मी भावजाई !
झाल्या तिन्ही सांजा धर कडी तामी वळी
बाळाला करंगळी !
झाल्या तिन्ही सांजा घरीं भुकेला ब्राह्मण
करा तयार भोजन !

---

## सखु वहीण सतीची ! : : : २९

सखु म्यां जोडली लेक वाण्याची मंजुळा
नेसे काळी चंद्रकळा !
सखु म्यां जोडली जातीची सोनारीण
बुगड्या[1] लेणारीण !
सखु म्यां जोडली कशी बामणाची कन्या
तिच्या वेणीला चाफ्याच्या !
सखु म्यां जोडली सुखी कमाराची बेटी
हातीं डबा मेणपट्टी !
सखु म्यां जोडली शिंप्याची अनसुया
हातीं तिच्या सदा सुया !
सखु म्यां जोडली वाण्याची लाडकी सून
काय सांगूं तिचे गूण
सखु म्यां जोडली झाली नाहीं सखु बरी
जिवाची जानागिरी[2] !

---

१ अगावर घालणारीं २ संकट

सखु म्यां जोडली सखूनं चालवलं
जहर कालवलं !
सखु म्यां जोडली बाई ! अधल्या पैशाची !
सखु बहीण सतीची[1] !

---

## कुंडाची महती मोठी ! : : ३०

केलं पुण्य काय बाई ! माउली यशोदा नारि !
न्हाणियेले विष्णु ब्रह्मा कसे तुवा हातावरी ?
केलं पुण्य काय बाई ! तुह्मी नाशिकच्या बाया !
आंघोळीला गंगामाई दर्शनाला रामराया !
नारायणाची ग ! कथा चाला ऐकायाला कोणी
चाले पुढं नामदेव मागून कां जाते जनी
तपामध्ये खरे तप अनसुये ! तुहे भारी
फोडांतून तळहातीं जन्मे देव ब्रह्मचारी !
बाई ! नाशिक त्र्यंबक गंगामाईचें माहेर !
भरजरी पातळाचा. करा रामाला अहेर !
बाई ! अड्याल नाशिक पड्याल ग ! पंचवटी
गोदेचे काळे पाणी कुंडाची महती मोठी !

---

## सखा माहा गेला वाया ! : : ३१

सखा चालतो थाटांत खाली सेमला[2] लोंबते
नार मोहना मागून कशी तुज्याला शोभते !

१ सतीची; सख्खी २ पटक्याचा पदर

कोण्या मोहन्या नारीची मोहिनी झाली खरी
माह्या सभेतला हरी कसा बोलवला घरीं !
सोडले घरदार नाहीं आशा लेकरांची
कोण्या मोहन्या नारीची मोहिनी ग ! चक्राची ?
रोज चाळ्याच्या दुकानीं बसतो माह्या राणा
मोहन्या नारी साठीं टाके हात उच्ची खणा !
चाळ्याच्या पालामदी बसतो चतुर्भूज
मोहन्या नारीसाठीं टाके हाताचा का गज ?
घरीं पुरणाची पोळी होते घाई जेवण्याची
लागली चटक कोण्या— मनमोहना नारीची ?
बाई बाजाराचे दिर्सी पाहे वाट बाजाराची
नार मोहना बसून कोण माह्या सर्दाराची ?
आणा कोणी जादुवाला बांधा त्यांच्या घरीं घोडा
करा कांहीं जादूटोणा नासे सुगंधी केवडा !
करा देऊ कोणा गाई त्रिका द्वारांतला हत्ती
आणा घरीं गणपती करू कोणाला विनंती ?
येऊं द्या कोणाला दया लागूं अशी किती पाया ?
नाहीं रिकामा एकाया सखा माह्या गेला वाया !

---

## भरल्या बाजारांत— : : : ३२

भरल्या बाजारांत आली रिकाम्या पदरीं
माह्या सरदार बाई ! आहे मुकुंद बावरीं !

# भरल्या बाजारांत

भरल्या बाजारांत पडे पालावर पाल
भारी दुकान मालाचं अजून कां नाहीं आलं?
भरल्या बाजारांत मोठं दुकान कोणाचं
गचपच पसाऱ्याचं किल्ली कुलुप सोन्याचं!
भरल्या बाजारांत लाल मसूर पालाला
मारते लाल ज्योत! कसं ओळखूं लालाला?
भरल्या बाजारांत ओटींत खुरदा जड!
वाजती कलदार रुपये खडाखड!
भरल्या बाजारांत काहीं हातांत अडका
साथ पाहतां मोत्यांची जीव झुरतो लाडका!
भरल्या बाजारांत रगीत साड्या दोन
कंबर खाली माही लोटत नाहीं मन!
भरल्या बाजारांत कोण लाल घोडीवर?
टाके हात कोणासाठी भरजरी साडीवर?
भरल्या बाजारांत कायचा[1] वास येते
कोण भोवताल बाई! माप पलंगाचें देते?
भरल्या बाजारांत बाई! बसली कब्हाची
नाहीं आली गाडी माझ्या कशी अजून बंधुची?
भरल्या बाजारांत फूलबिसण[2] चमेली
कोण बसून दुकानीं दोडे विकत बसली?
भरल्या बाजारांत आम्हा म्हणे कोण गळ्या
"काय पाहतां या बाई! ल्याना टोपाल्या बुगड्या!"
भरल्या बाजारांत म्हणे आम्हा "कशी बाई!
बंधुची मैतरणी तुमची मी भावजई!"

---

१ कशाचा २ बिसिनीच्या फुला प्रमाणें कोमल.

## गोरीनं केला छंद ! : : : ३३

गोरीनं केला छंद नाहीं पाहिला वयाचा
बाल पिकला डोईचा !
गोरीन केला छंद पाहिला सावकार
सोन्या चांदीचा व्यापार
गोरीनं केला छंद जातीचा बेलदार
माडी त्याची गुलजार !
गोरीनं केला छंद जातीचा रजपूत
कशी कमान शाबुत !
गोरीनं केला छंद कोणी जातीचा लोहार
कुलपांचा रोजगार !
गोरीनं केला छंद नाहीं पाहिला जातीचा
आवा लुटला मातीचा !
गोरीनं केला छंद छंदाला नाहीं जागा
रुपाची चंद्रभागा !
गोरीनं केला छंद छंदाला नाहीं भेली[1]
निंबाचा पाला पेली ![2]
गोरीनं केला छंद छंदाला नाहीं बंध
काय करे भाऊबंद ?
गोरीनं केला छंद लेली[3] कपाळी बिजुला
तिचा शाही डब्बेवाला !
गोरीनं केला छंद गळ्यांत चंद्रहार
नानापरी शिणगार !

---

१ भ्याली २ प्याली ३ ल्याली.

गोरीनं केला छंद काजळ उलटा भांग
केले सारे रंग ढंग !
गोरीनं केला छंद पूजले खोडखाड
बसली तुळसी पुढ !

*　　　*　　　*

गोरीनं केला छंद निंदक को निंदा करी
पाण्याच्या रस्त्यावरी !

---

## कसारीण बाईस ! : : : ३४

कसारीण बाई ! बिलोर भर मला
रुपया देतो तुला
कसारणि बाई ! मोल बांगडीचें कर
नार कन्हाची समोर
कसारणि बाई ! सोड गडे ! माहा हात
पाहे वहिनी रागांत
कसारीण बाई ! बांगडी कां चढवतां
लागे कळ मणगटा !
कसारणि बाई ! बस झाडाच्या साउलीं
बुडा भरते बाहुली !
कसारीण बाई ! बांगड्या भर दोन
आली गरिबाची सून
कसारीण बाई ! भर मोतिचा बिलोर
उभी राधिका सुंदर !

कसारीण बाई ! आंथर सवाण[1] गोणा[2]
लेती चुडा लेकी सुना
कसारीण बाई ! टाक खालीं सतरंजी
काढ चुडा पंचरंगीं
कसारीण बाई ! उतर ये साउलीला
भर चुडा माउलीला
कसारीण बाई ! उतर या ओसरींत
चुडा पाहूं दे रंगीत
कसारीण बाई ! सांग उद्या कसाराला
जाते मैना सासऱ्याला !

---

## घाले कोण रोज फेरी ? : : : ३५

मुक्या अस्तुरीची निंदा पुरुष कां रोज करीं
सुख कपाळांत नाहीं काळ बांधला पदरीं !
रोज अस्तुरीची निंदा तिचा मांडतो पुरुष
सुख भोगाया ठेवलं माहेर न चार दिस !
अस्तुरी कां पुरुषाची चाले सदा किटकिट !
ब्राह्मण तो वेडा कोण पाडली ही ब्रह्मगांठ !
अस्तुरी कां पुरुषाची रोज घरीं घिण घीण
कोण्या ब्राह्मणानं वेड्या असं लावलं लगन !
अस्तुरी कां पुरुषाची ख्याली खुशाली दिसेना
टीप दोघांची बसेना सूत घरांत असेना

---

१ सारखा २ तळव व आंथरण्याचें कापड ३ स्त्री

अशी वैतागली गोरी — आपल्या कां जीवावरी !
गेली गांवाच्या बाहेरी — पाहे भरल्या विहिरी !
रोज हांसून बोलून — जाते नार पाणीयाला
तिच्या अंतरींचं दु:ख — काय ठाऊक कोणाला ?
नार वैतागली मनीं — दिसीं सोमवाऱ्या न्हाली !
पिंड देवाच्या देउळीं — पाण्यानं कां झाली ओली !
कसा उदासला जीव — झाला बाई ! पुरा वेडा
म्हणे " जाऊ कोण्या झाडा ? आली आमराई पाडा !
जीव ऊदासला पुरा — म्हणे " कोण्या वनीं जाऊं
काय जहर वा घेऊं — जीव कशाला हा ठेवू ?
नार वैतागली पुरी — आपल्या कां जीवावरी ?
पुढं माग भोवताल — साऱ्या विखाच्या विहिरी !

*　　　　*　　　　*

नार वैतागली पुरी — घर बांधते डोंगरीं !
कोण तिच्या गुंफेवरी — घालतो नेमानें फेरी ?

---

## वरमाय जागी करा : : : ३६

लग्नांत आणलं — नुसत्या साखरफेण्या
　　नवरी राजकन्या !
लग्नांत आणलं — निऱ्या वाटोळ्या मालत्या ?
　　कोण मानाच्या खुलत्या ?
लग्नांत आणलं — लांब सुतळी सेवया
　　सुगरिणी भावजया !

वऱ्हाडी लोकगीतें

रुखंत आणलं करंज्या लाडू बहू
वरमाय कोठे पाहूं ?
रुखंत आणलं गोड अनरसे फार
कोण वरमाय थोर ?
रुखंत आणलं गाजत वाजत वेशीं
वरमाये एकादशी !
रुखंत आणलं वाजत गाजत घरा
जागी वरमाय करा

---

## उपाशी गेले दादा ! : : : ३७

भाऊ बहिणीच्या दारीं भर उन्हाचा कहर !
दोन पहार दुपार !
भाऊ बहिणीच्या घरीं गेला कोण्या समयानं
केली गर्दी ऊन्हाळयानं
भाऊ बहिणीच्या दारीं उभा राहिला अंगणीं
नाहीं गंगाळांत पाणी !
टाकतांच पाय दारीं सासुरवास ये कानीं
झालें काळजाचें पाणी !
आल्या पाउलीं कलोनी उभा गल्लीवर राहे
बहीण आंतुनी पाहे !
बहिणीचा सासुरवास नाहीं कानीं ऐकवला
जीन घोड्यावर केला

'मरो बहीण,' म्हणोनी घोडा फिरवला रानीं
नाहीं पाहिलें फिरोनी !
सेवया बोटोळयांनीं[1] उतरेव्या आगाशीं[2]
भाऊ निघाला उपाशी !
घरी वासाचे तांदूळ काय करतां असून
सासुरवासी बहीण !
घराच्या वळणींत उभी राहिली बहीण
म्हणे "दादा जा भेटून"

* * *

आंब्याच्या सावलींत कोयाळ[3] बोले राधा
"उपाशी गेले दादा"

---

## गोरीला लागे पान ! : : : ३८

गोरीला लागे पान बारियांच्या वेटाळांत
डोले नाग पेटाऱ्यांत !
गोरीला लागे पान नाग जहरी तुफान
करे आंगाची अगीन[4] !
गोरीला लागे पान हिंडे नाग दरोदरीं
वैद्याच्या नार घरीं !
गोरीला लागे पान नाग मोठा कां लहान
आणा गारुडी मोहन !

---

१ बोटवे २ आकाशीं ३ कोकिळा ४ आग

गोरीला लागे पान  नाग मोठा नाहीं ताना
गारुडी मोती दाना !
गोरीला लागे पान  नागाच्या तोंडीं विख !
गारुडी नवा शिक !
गोरीला लागे पान  आंगीं नागाच्या डाहण्या[1]
पान उजळ शाहण्या !
गोरीला लागे पान  नाग गव्हाळया गुहीऱ्या
बाऱ्या चालूं द्या दोहिऱ्या !
गोरीला लागे पान  नाग काळा मोठा दुंडू
निंबानें कोंडा झेंडु !
गोरीला लागे पान  पाहतां कां आराधुरा ?
वेणीला द्या बंध पुरा !
गोरीला लागे पान  नाहीं सोसवत कळा !
पान बेगीनं उजळा !

---

## पितळी पलंग : : : : ३९

पितळी पलंग  नेवार[2] रेशमाची
शोभा रंगमहालाची !
पितळी पलंग  खिळे माठले लवंगीं
कोण कारागीर रंगी ?

---

१ दाह २ नवार

## गाळे आसूं मोरावाणी !

पितळी पलंग कोणी रंगवली सीता

विडे रामाहातीं देतां ?

पितळी पलंग नाच मोराचा चालला

कोण्या चातुराची कला ?

पितळी पलंग कसा कातीव कातला

हाती कोणाच्या वासला ?

पितळी पलंग काय बाई ! गोंडे लाल

पडे पाहताना भूल !

पितळी पलंग केवढी कारागिरी

ठावे नक्षीदार च्यारी !

पितळी पलंग कसला कोणी तंग

वर आरशाचे भिंग !

पितळी पलंग गात हिरवे रंगीत

उडी वरून वनात !

पितळी पलंग जाळी पहा भोवताल

कोण आत रंगाळ ?

---

## गाळे आसूं मोरावाणी ! : : ४०

जंगल काळा कीट नाही कशी मुंगी खिळे !

बहिणीच्या जीवासाठीं घोडा महिन्याचा पळे !

बहिणीच्या जीवासाठी झुरे भाऊ जसा मोर

जंगलचे जनावर सारे शोधले डोंगर !

बहीण आणूं गेला दाट जंगल झाडीचा
वमर्णीत बंधुराज माणो बसला शाळीचा !
आता बाहिणीच्या गांवा नाही माउली झाडाची
राहे मजल इळाची[1] तिच्या आवड गांवाची !
बाहिणीच्या जीवासाठीं पुरा वेडा पिसा झाला !
भोवताल झाडवन थेट एकटा निघाला !
जातां बाहिणीच्या गावीं वाळी बाधली पिवळी !
राहे बहीण देशांत दूर दिल्लीच्या जवळी !
जातां बाहिणीच्या गांवीं वेट पडतां गाडीचा
चाक टाकून रस्त्यात जीन सवारे घोडीचा !
जाता बहिणीच्या गावीं बंधु इळाचा उपाशी
उन्हातान्हांत चालला कसा पायीं कोसोकोसीं
बहिणीचे जीवासाठीं गेला चाळ्याच्या दुकानीं
बोल बोलला चाळ्याला "काढ साड्या सिरादाणी"
बाहिणीची बोळवण करी भाऊ समरथ
पायीं आमराच्या मार्गे जाय गोऱ्हा हुंबरत !
बहिणीची बोळवण भाऊ समरथ करी
राधा कुशावर्तात गेली बोलून हासून घरीं !
आपल्या घरी जातां बहीण गुरमळे[2] !
तिचा मुकुद बाधव तिला घेऊन कवळे !
बहीण सार[3] केली माग परतले लोक
भाऊ जागचा हालेना! भावाला बहीण एक !
बंधु बोळवण करी गंगासागर बालीची[4]
बसे चाळ्याच्या दुकानीं हिंडे पेठ नगरीची !

---

१ वेळाची २ घोटाळते ३ बिदा केली ४ एकप्रकारची साडी.

## पारध्या दादास

बंधु बोलवण करी  बांधे माय दहीभात !
बसे बहीण गाडीत  भाऊ सारखा पहात !
लागतां तहान नाहीं  पाण्याचा कुठं खोज
वाटेत बहिणीसाठीं  खोदे असा सरागज !
बहीण सार केली  झाडाच्या आड झाला
लावे नेतराला शेला  माय समजावे त्याला !

*  *  *

नाहीं भावाला बहिणी  स्वर्ग कमी कां म्हणुनी
भाऊ चाळ्याचे तुकानीं  गाळे आसूं मोरावाणी !

---



बाई ! वाघिणी ये ! तुहा[1]  सांभाळ बिपळ्या वाघ
माहा पारधी येणता  गेला कालवडी मागं !
कसा एक एक डोळा  बाई ! हरिणाई ! तुहा
लप शिकारीला येष्या  पारधी बधु माहा !
माझ्या पारध्या दादाची  नाहीं शिकार साधली
बाई ! जाळ्यांत हरणी  कशी लहान पडली !
पारध्या दादा ! माझ्या  नको जोडू वाया बाण
काय करतो वधून  गड्या ! हरिणी लहान !
पळे हरणी कुरून  कशी कूपकाटीं पडे !
माझ्या पारध्या दादाच्या  पदरांत पुण्य पडे

1 तुझा

वावरांत काळया शार मोठी हरणी निजून
पारध्या दादा ! धांव टाक जाळे रे ! शेजून[1]
मार तुह्या वाघ वैरी भर बारूद संदुकीं
जोड खुशाल बाराच्या दोन्ही जोडीच्या बंदुकी
पारध्या दादा ! गड्या ! मार वाघ येतां जातां
नको रे ! वाया मारूं कधी मोर पाणी पितां

---

## डोळा भरून पाहीन ! : : ४२

कडु पिकलं कारलं महा देवाला वाहिलं
सूनमुख म्या पाहिलं !
कडु कारल्याची फोड शंकराच्या पिंडीवर
घेते सून मांडीवर !
कडु कारल्याची भाजी नको वाढूं माह्या ताटीं
केले व्रत सुनेसाठीं
कडु कारल्याचा वेल फुलांनीं गहिरेबाज !
सासूचा आशिर्वाद !

* * *

माह्या हवेलीचा खांब लेक वडील साजरा
सून शोभे बिजवरा !
देते लेक मोठ्या घरीं सून माह्या गरिबाची
वैापर निगुतीची[2] !

१ जवळून २ नेमस्तपणाची, मोजकी

## डोळा भरून पाहीन

साजरी मैना माही आली घरीं भासी सून
राहे घराला भूषण !
कशी सोन्याची टिकली सूनबाईचे कपाळा
कंठी शोभते गोपाळा !
सूनबाई लक्षुमीचा नाहीं सयपाक झाला
चांद चौकामंदी आला !
सूनबाई लक्षुमीचा कामात गेला वेळ
कपाळीं कुंकु शिळ !
माझ्या लाडक्या सुनेला लाडके काम सागा
पूजेला पाणी मागा !
हातीं बांगडी काचाची केसाहुनी ग बारिक !
काय लेन्याची तारिफ !

* * *

लाडकी सूनबाई विहिणीबाई ! मला
धाडू कशी पाणियाला ?
विहिणीबाई ! माही लाडकी सून गेंदा
सांगू कशी काम धंदा ?
सून वागवीन माही विहिणीबाई ! घरीं
लोकाचे मी बरोबरी !
गोठ पाटल्यांनीं हात दिसे कसा शोभिवंत
लेक माहा तालेवंत !
लागतां तहान रातीं सूनबाई लाडकीला
वर कारंजे माडीला !

वर माडीवरी उभी सूनबाई चंद्रकळा !
शालूला घालते पिळा !
माजघरांत आंतल्या सून लाडकी निजते
शालू पांघरून घेते !
करते घरांत काम बाहेर देते चित्त
गोड बोलतां पढित !
लाडकी सून माझी भ्रताराची मोठी लहू[1]
कशी माहेरा पाठवूं ?
रोज फुलांची रजई लेक कौतुकाची सून
पांघरती दोघेजण !

*    *    *

लेक बोलका पंडित सून लाडकी मालन
रोज दोघाचं कौतुक डोळा भरून पाहीन !

---

## पुढं पारणं फिटलं ! : : ४३

गाडीचा बमणेवाला आला माझ्या घरीं पायीं
माझ्या बाबाजीला बाई ! मान पान गर्व नाहीं !
गाड्या बैलांनीं नांदता मोठा मानाचा चुकता
दुबळा माझा पिता चोळीची बाहे चिंता !
गाडे घोडे बैल घरीं असामी मोठा मामा
काय करतां असून निढ़ार्नीचे पिता कामा !

*    *    *

" आज सासुरवासाच्या बांधल्या ज्या पुड्यापाड्या !

१ प्रीय

# पुढं पारणं फिटलं

बावाजी आले घरीं सोडते त्या थोड्याथोड्या!
आपल्या संसाराची सांगतांना हरिकथा
माझा निजला बावाजी झाला एकाएकी चेता[1]!
आज तुला संसाराच्या पिल्या! सांगतो काहण्या
कान देऊन तूं ऐक चित्त लावून शाहण्या!
रोजचा सासुरवास कटु जिवावर किती
पिल्या! नांवासाठी तुझ्या मरते मी दिनराती!
आते शेवावरी रात काय सांगू सासुरवास
कसा भरल्या सभेत जवाण तू हारलास?
रोजचा सासुरवास सोसूं असा कुठवरी
दुखन लेकीचं पिल्या! येईल रे! गंगेवरी!
मोल सोयऱ्याचे बोल तरवारीच्या ह्या अण्या!
काय मनांत समज पुरं आपल्या शाहण्या!
पिल्या तुझे जरी बोल जाई मोगऱ्याचे फूल!
काय सोयऱ्याला त्याचँ कळणार खरं मोल!
ऐक सोयऱ्याचे बोल कडु निवाची मातर[2]!
पिल्या! जाईल तुला रे! रात वैऱ्याची कहर!"

* * *

बाप बोले "बाई! लेकी मागून तू नांव कर
केळीच्या शुद्ध पोटीं कमळ[3] निपजलं!
आलो न्यावयाला तुला नाहीं बोलत जावई!
जागीं राहिला विचार कशी नेऊ तुला बाई!"
म्हणे बाप पोरी! कशी तानपणीं मेली नाहीं
तुझ्या संसाराची पोथी ऐकवली नाहीं कांहीं!

१ जागा २ मात्रा ३ कमळ; केळफूल

बाप म्हणे "लेकी! तुझा नशिबी कटकट!"
काळ्या दगडाची भिंत पाया पुरा बळकट!
रोज सरणाचे पुढं जळते ओले खोड
नशिबांत हडहड कष्टाने नार गोड!
बाप म्हणे "कशीबाई! पुरी नशिबाची हीण!
सारे डोंगर शोधून पाने पळसाला तीन!
दिली घरीं मोठ्या लेक नाही हात म्या धुतले!
हळदी कुंकवानें नाहीं रगले बगले!

*　　　　*　　　　*

आज सासुरवासिण घरी जाण्याच झाडण
पोटच्या बालकान पुढ फिटल पारणं!

---

## नीळकंठ झाडावर! : ४४

घोडीनं केला हीस दणाणला दरवाजा
पाहुणा कोण राजा?
गांवाच्या चावडींत बसला माहा साहु
समोरा गेला भाऊ
रेशमी खांदी शेला पागोटी भरजरी
मामाजी आले घरीं
बाई! मामाजी पुसती "कोणाचा हा धारी वाडा
चित्र लिहिले कवाडा?"
भाऊ दाखवे बोटानें "तुमच्या भासचिं घर
उभी अंगणीं उंबर!"

घरीं मामाजी पुसती " आलीस काय-तानं ?"
खोडिली जाकळपानं

मामाजी आले घरीं भासा मीठा कारभारी
शालीला सोनं भारी !

मामाच्या पगतींत भाच्याचा नोक झोक
गळ्यांत कंठी गोफ !

जेवण जेवतांना ताटीं एका मामे भासे
रूप जेवतांना दिसे

डोळे गुंजदार काळे कशा भिवया कमान
दोघांचाही एक बान !

माझ्या मामाजीच्या घरीं गेली बाई ! पाहुणीन
चारी समया लावून !

बाई!मामाजीच्या घरीं भासीचं पात्र कडे
अखंड काशी घडे !

लंका दिसते दुरूनी हवेली मामाजीची
काशीच्या माहेराची !

फाटकी माझी चोळी निरोप धाडा वाड्या !
माझ्या मामाजीच्या वाड्या

मामाच्या पंगतींत नुपर गेले तूप
आला भासा देवरूप !

वाघ मारतो जाळींत ससा रानांत बघतो
भासा मामासंगं होता

मामाजी घोड्यावर चाले भासा पायीं पायीं
मुजरा कां घेत नाहीं ?

घोडी मामाजीची पहा — भाऱ्यानें कां अडवली
लेक मैना वेडं केली !
सण दसऱ्याचे दिसीं — मामे भासे घोड्यावर
नीळकंठ झाडावर !

---

## उजेड महालांत ! : : ४५

जावया बापुजीची — हवेली सातखणी
शालूला घाली पिळा — वर उभी मैना राणी !
जावया बापुजीची — गाडी सुटली बागांत
घेती भेट वाटेवरी — रामरमीची[1] अगत[2] !
जावया बापुजीला — विडा साळीं हातीं देते
बाई ! रुपाया मानाचा — कशी वाजवुनी घेते !
जावया बापुजीला — विडा लहान साळीचा
देते हातांत रेशमी — लाल रुमाल जाळीचा !
जावया बापुजीला — बाई ! माझ्या देशमुखी
वतन बारा गांव — रयत मोठी सुखी !
जावया बापुजीचा — उभा सूर्यामुखी वाडा
अंगणांत चंदनाचा — पडे काडकीचा सडा !
माहे जावई बापुजी — मन संतोषे पाहून
जोडा शोभते संगीन — कशी काडकी कामीन !

१ रामराम करण्याची २ अगत्य

## उजेड महालांत

गुणी पाहतां जावई माझा संतोषल्या भुजा
काढणी गे! सुखी जोडा करो राज[1] सदा तुझा
जावया बापुजीला गांवा घोड्यावर जाणं
बसे मेण्यांत माळून लाल पडदे सोडून!
आले जावई बापुजी घरीं उतरले राजे!
लाव कपाळीं अक्षीद कर आरती सारजे!
सोन्याचं पंचीपात्र उटून चकचक!
जावया बापुजीला देते पाणी माझी लेक
जावया बापुजींचें नांव गोड उदेभान
लेक लाडकी नांवाची तुळसाई गोरीपान!
जावया बापुजीला गांवाचे पाटीलपण
नांव डंक्यावर भारी हातीं उकळतीचं पान!
जावया बापुजीच्या पंखे नाक्यावर डोळे
बाई मैनाच्या सोन्याचे बोटी झळकती सळे!
केल्या बारिक सेवया साऱ्या ताटाखालीं गेल्या!
जावया बापुजीला नाहीं जेवतां त्या आल्या
जावया बापुजीच्या अंगणांत बागशाही
फुलें हलक्या हातांनीं तोडे रोज मैनाबाई!
जावई रामचंद्र लेक माझी सीताबाई
भाग्याला पार नाहीं! कौतुक मी करूं काई!
रूळ तोडे शिंदेशाही माझ्या सीतेच्या पायांत
पडे जावई रामाच्या उजेड महालांत!

---

[1] राज्य

## शेजारीण बाई !



शेजी[1] सदा घाली | ग्वाडे ! सख्याला जोडून
राजस बाळ माझा | आला गंगोळी मोडून !
शेजारीण बाई ! | शेजार धर्म राख
राजस बाळ माझा | हिरा पदरानं झांक
शेजारीण बाई ! | शेजार तुझा माझा !
निजला पाळण्यांत | लाडका शाहुराजा !
शेजारीण बाई ! | पलंग आळी पाशी
आहे निजून घरांत | बाळ माझा सुखवासी[2] !
शेजारीण बाई ! | अंगण झाडू लाग
तुही मैना माझा राघु | रोज खेळतील दोघ
शेजारीण बाई ! | धन्य तुझ्या संसाराची
झाले वर्ष बारा बाई ! | नाहीं याद माहेराची !
शेजारीण बाई ! | नको करूं नसनस[3] ;
दारीं तुझ्या गुलाबास | येते फूल, तोडायास,
शेजारीण बाई ! | तुहा शेजार सोन्याचा
येते तुहा राग बाई ! | उगिर[4] बोलण्याचा !
शेजारीण बाई ! | जळो तुहे गं नेतर[5]
वाळते आंगणांत | माझ्या बाळाचं धोतर
शेजारीण बाई ! | आवर तुही मैना
बोलका राघो माझा | झाला एकाकी शाहणा !
शेजारीण बाई ! | झाली भिंताची या माती !
लाडाची मैनावती | कशाला मी बोल हाती ?

1 शेजारीण  2 सुखलोलुप  3 किरकिर  4 वाईट  5 नेत्र

शेजारीण बाई ! केली जिवाची या [illegible]
लाडाचा [illegible] घालूं कशी त्याची आण ?
शेजारीण बाई ! ऐक कर्माची गत !!!
झाडाला या करपूर ! साहूं किती हृदयांत ?
शेजारीण बाई ! गरज तूं आज सार.
मातेचे घर दूर ! लागते पळीभर
शेजारीण बाई ! उसणे दे थोडे मूग
पाहुणे आले घरीं जिवाचे जिवलग !
शेजारीण बाई ! नको बोलूं तूं गर्वानं
दिलं देवानं म्हणून नशिबीं दुबळेपण !
शेजारीण बाई ! नकीं राहूं अबोल्यानं
तुला मला अंतीं जाणं बाई ! एका मारगानं !

---

## गांवाला गेले बाई ! ४७

गांवाला गेले बाई ! नाहीं अजून कां आले
कोमायले फुलझेले ?
गांवाला गेले बाई ! नाहीं पुसून ते मला
हार खुटीचा सुकला !
गांवाला गेले बाई ! नाहीं कोणाला सांगून
हार ठेवला गुंफून !
गांवाला गेले बाई ! नाहीं अजून कां पत्ता
हार केला जातां येतां !

## वऱ्हाडी लोकगीतें

गांवाला गेले बाई ! याद[1] घडीघडी त्यांची
रोज गोड बोलण्याची !
गांवाला गेले बाई ! देऊं कोणाला हा विडा
पडे सुना पानपुडा !
गांवाला गेले बाई ! जाळी गुंफली पलंगा
येतील ते कधी सांगा ?
गांवाला गेले बाई ! नाहीं डोळयाला डोळा
जीव झाला सवा तोळा !
गांवाला गेले बाई ! टाकूं कोणाला मी पाणी
पाहे वाट अंगधुणी !
गांवाला गेले बाई ! वाढूं कोणाला हें ताट
रिकामा चौरंगपाट !
गांवाला गेले बाई ! पाला पडला अंगणीं
वाळे हिरवी निंबोणी !
गांवाला गेले बाई ! घास तोंडातला फिरे !
मन मोरावाणी झुरे !
गांवाला गेले बाई ! सुटली ही वाराधुंद
कोण्या वनांत गोविंद ?

---

१ आठवण

## गाईचं गोठाणं : : : : ४८

गाईचं गोठाणं रोज भरते शेणानं
गवळ्याच्या धनानं
लेकुरवाळीच्या कामधंद्याला उशीर
घरीं बाळांचा गजर !
लेकुरवाळी झाली नित जंजाळीं गुंतली
माहेर विसरली !
दंडाचा[1] पाळणा वाजते कारकीर !
शोभते घरदार !
लेकुरवाळीचा सदा दवडींत[2] हात
दिसे वांझोटीला रात !
लेकराचा खेळ लेकुरवाळी पाहते
वांझोटी पाण्या जाते !
वांझोटी वांझोटी झाली कशानं वांझोटी
दैवाची पुरी खोटी !
वांझोटीची माडी बांधली पहायाला
लेक जावई रहाला[3] !
महालांत दिवा जळतो लावणीचा
घेते दत्तक लोकाचा !
वळणींचा आंबा पाणी घालून मोठा केला
विहानीला कामा आला !

---

१ [illegible] दांडाचा २ अन्न ठेवण्याच्या ढोपलींत ३ रहावयाला

भरल्या गंगेंत पिंडाण पाडी एक
पुतण्या केला लेक !
नाहीं पोटजन लेक घेतला जाऊचा
पिंड टाकला वाळूचा !
मोती सोनं नाणं कोण पुसतो मालाला
मान कन्या पुत्र लाला !
पाळण्याची दोरी हालते ज्या घरांत
शाहणा धुते हात !
काय ते असून उदंड अनधन !
नाहीं पोटीं नारायण !

*     *

पोटाच्या पोरा विना पुण्याची ठेव करी
माय बापाची कावड नेतो कोण रामेसरी² ?

---

## नाहीं कपाळ रंगलं !     :     :     ४९

झाल्या पोटीं पोरी निंबाचा कडुपाला
पित्याला खर्च झाला एका चोळी लुगड्याला !
आल्या पोटीं पोरी बाप म्हणे " पर धन "
बोले माय " असो माही कलिजाची शेजारीण ! "

---

१ पिंड २ रामेश्वरी

## नाहीं कपाळ रंगलं

आल्या पोरी तुझ्या पोटी नको धाक मनी बापा ! ”
दूर उडून जाईल तुझ्या चिमणीचा ताफा !
नको आगणांत जाई लावू माहे मायबाई !
जातां सासऱ्याला लेक फुलांची रवदळी !
तुझ्या अगणी मोगरा कोण करील अदेशा
नको लावू बापा ! लेक जाते तुही दूर देशा !

* * *

चिंता लेकीच्या पित्याला झोप रातदिन नाही
विचार रोज मनी “ लेक देऊ कोण्याठायीं ? ”
चिंता लेकीच्या पित्याला चार पहार घोकणी !
कोणाच्या पदरात “ बांधू माही हिरकणी ?
नवरी आले पाहू मोठ्या पागोटीचे कोण
रुपाया दिला हातीं भरे ओटी नारळानं

* * *

पहा लेकीच्या पित्याचं झाल पांढर आगण
बसे पिता पाटावर मांडले कन्यादान
लेकीचे मायबाप करे दुळाचे उपाशी !
करिती कन्यादान सोडिती एकादशी !
लेकीचे मायबाप करिती कन्यादान
चुन्या भरले शाहणे नाहीं खात कधीं पान !
लाल कापडी मांडव केली खुशी मनाजोगी
पैसा उफणला हातीं पाण्यावाणी जागोजागीं !
बापाने दिली लेक देऊन झाला चोर

जावई सावकार नाही बोलण्या उजूर !
उन्हाळ्याच उन्ह ! तपे नागीण तणात !
लेकीचे मायबाप रोज जळतो मनांत !

कशी लेकीच्या बापान लेकीची केली माती
दारी कम्पाबाच्या उभी केली गाय पारावती !
लेकीच्या बावाजीन लेकीच केले वन
दारी कम्पाबाच्या कशी गाय बांधली मोहन
वर्ष झाले बारा ! बाई पोरीच्या भेटीला
चोळी आजिरी टागून कशी ठेवली खुंटीला !
पडे अस्सलाची कार[1] कमशीलाचे का हाती ?
जिवाची निठ्या मार्गी डोळे रडून सुजती !
बापाने दिली लेक पाहिले न घरदार
लोटली भनावर केल लेकीच ना चर !

म्हणे बाप " बाई ! तुला नाही दिली गोमाळ्याला
पाहिला हुंडीवाला ! पालखी बसायाला !
काय करू बाई ! तुझ दैव ना चांगल
लाल कुंकवानं पुरं नाही कपाळ रंगल !

---

१ मुलगी

## माह्या जीव गेला ! : : ५०

माह्या जीव गेला नका करूं माझे येले[1] !
मेतील ते तळहातीं माहेरचे फुलझेले !
माह्या जीव गेला भार धरणीला झाला
मोडी देणार जिवाचा लाल कम्मा दूर गेला !
माह्या जीव गेला आयाबाया कुपकाटीं
आली धावून कामिना कशी अखेरच्या भेटी !
माह्या जीव गेला शामी[2] ! डोळ्यांत कां पाणी ?
तुम्मरी हो ! करा राणी नवती तुमची ज्वानी !
माह्या जीव गेला बापाच्या मांडीवरी
टाकला शेला कोरा उवच्या तोंडावरी !
माह्या जीव गेला लोकांच्या तोंडी विडा
कसा कोमावला बाई ! जन्माचा माह्या जोडा !
माह्या जीव गेला घरीं शिक्यावर आंबा
माता सारजा बोलली "टाकून जाते कां रंभा ?"
माह्या जीव गेला टाका वम्मरींत बाज
करतील शामीराज[3] मातीची माह्या वज !
माह्या जीव गेला आले पाठ पोट दोनीं
ढकले पाठचा वेणी पोटचा पाजे पाणी !
माह्या जीव गेला रडे माझी मैनाराणी
दूर जावयाची जात उभा शेजाऱ्याचे वाणी !

१ विटंबना २ स्वामी ३ स्वामीराज

माह्य जीव गेला नको सांगू रे ! साजणा !
पिता बसला भोजना माता मांडल रोजना[1] !
माहा जीव गेला लोका तोंडी "मेली मेली"
ऐका भ्रताराची बोली "राणी तिरथाला[2] गेली"
माहा जीव गेला भींतीच्या आसऱ्यानं
नाहीं झोप साऱ्यारात दिली मांडी भासऱ्यान[3]
माहा जीव गेला जन म्हणती "उचला"
पाठचा बधुराज मांडी देऊन बसला !
माहा जीव गेला वाटीत तावा तूप
पहा गोळणीच बाई ! कसं झळकतं रूप !
माहा जीव गेला काशी गहिरे[4] साऱ्यारात
भरजरीचा पदर भिजला सवाहात !
माहा जीव गेला लोक मारे काठोकाठीं
माहा मायेचा एकटा हातांनीं माती लोटी !
माहा जीव गेला भरला मागा गाडा
लाडाची आली मैना दारांत भंड घोडा !
माहा जीव गेला जन यमलं कव्हांचे[5] !
वाट पाहतो कोणाची वेळू उपमा गळीचे[6] !
माहा जीव गेला अगीन भडकली !
जिवा भावाच्या धन्यान सुपारी सडकली !
माहा जीव गेला भरा ओटी मायबाई !

१ रोदना २ तीर्थाला ३ वडीलदीराने ४ गहिवरली
५ केव्हाचे ६ वळचणीच्या गळीचे

## पूस पाय रुमालानं

तुमच्या महालाला येणे परतून नाहीं !
माहा जीव गेला मातीला झाली माती !
आली बसून गाडींत गिरजा कोणाच्या भेटी !
माहा जीव गेला रस्त्यावर मूठमाती !
कोण पाहतां डोळ्यानीं हातांनी खडवे छाती ?

---

## पूस पाय रुमालानं : : ५१

दुबळा भरतार नको करूं तू हेलना[1]
कुकु कपाळाचे लाल सोनें दिल्याने मिळेना !
दुबळा भरतार नको म्हणू वेडा बाई !
समरथ बाप आई सत्ता तुही तिथ नाहीं !
भरताराच दुबळ्या जुनं फाटकं नेसावं
बाप समरथ आई त्याच्या वमरीं नमावं
कपाळीं लेतां कुकु नोहे पुसुं पदराने
बाई नशिबीं लिहिला जोडा देव नारायणे
जोडा लिहिला दैवांत बाई ! पुजावा प्रीतीनं
घासूं नये कधी शेण कुकु कपाळीं पुसून !
दुबळ्या ससाराचा आणावा भाजीपाला
आहे मोठा हुंडीवाला काय होय आपणाला !

१ अवहेलना, हेळसांड

साधा भोळा भरतार म्हणो कोणी वेडापिसा
घरच्या अस्तुरीनं देव नेमावा तो जसा!
दुबळा भरतार नाहीं भरत कां मनीं ?
माहेरीं नको करूं जाऊनी तू शेणपाणी!
सर सतीच्या धन्याची पोरा पोटच्या येईना।
शिरीं संकटाच्या थोर देव कुणाचा होईना।
भोळ्या नवऱ्याचं राज हत्याचा बाई! मोदा
राजी धन्याच्या सुखान भोगते नार मौजा!
रोज अंबाडीची भाजी नित तोडावी ओऱ्यांत
मायबापाची मपत आपल्या न खातरींत!
भरताराची दुबळ्या करे सेवा पतिव्रता
टाके अंघोळीला पाणी रोज सूर्य उगवतां!
भरताराची दुबळ्या करते मनानं सेवा
डोले पखा हातीं जिच्या घेते मुखीं लोक नांव।

*　　*　　*

भरताराची दुबळ्या कर सेवा हुमानान
नको करू अनमान पूस पाय रुमालान

---

## मोजे वाघिणीच्या दाढा : : ५२

वाटच्या वाटसरा! वाटेनं तू उगा जाय
आगाशीं[1] आंबा, गोटा मारून करिसी काय
वर उभी माडीवरी राजाची कन्या फिरे!
वाटच्या वाटसरा! घालिसी खालीं फेरे!

1 उंच, आकाशीं

# मोजे वाघिणीच्या दाढा

| | |
|---|---|
| पाण्याला गेली गोरी | नदीच्या पेडावर |
| वाटच्या वाटसरा ! | नजर कां गोऱ्यावर ? |
| बरठीण धुते धुण | गोटा चिक्कण चोपडा ! |
| वाटच्या वाटसरा ! | मारिसी कां हाती खडा ? |
| शिंपीण दारी उभी | हाती रंगीत रुमाल ! |
| वाटच्या वाटसरा ! | बोल अडली कां चाल ? |
| धुते नार कशी शेला | पाढऱ्या कागदावाणी ! |
| वाटच्या वाटसरा ! | सुटे तोंडाला कां पाणी ? |
| वाटच्या वाटसरा ! | झाला तलपीन[1] वेडा |
| हात घालसी का अशा | म्हणून तू झाडाझुडा ? |
| वाटच्या वाटसरा ! | भल्याची चालली बेटी |
| नजर तुझी मोठी | नारीच्या नख बोटी ! |
| वाटच्या वाटसरा | नको लावू पाप तोंडा |
| जाय आपल्या वाटेन | नाही गोरीच्या पावंडा |
| माय बापाच्या रे ! पोटी | जन्मली लेक नेक ! |
| वाटच्या वाटसरा ! | नको लावू पाप्या ! नाक ? |
| वाटच्या वाटसरा ! | वाटेन तू उगा जान |
| पहा भल्याच्या लेकीन | खाली घातली रे मान ! |
| वाटच्या वाटसरा | तुझी नजर पापाची |
| भल्याची बहुबेटी | काय तुझ्या रे ! बापाची ? |
| वाटच्या वाटसरा ! | हांससी तूं कां रे ! मला |
| राग बांधवाला आला | लावे हात कट्यारीला ! |
| वाटच्या वाटसरा ! | लेक जन्मते चिल्हाटी[2] ! |

१ तडफीने २ एक प्रकारचे काटेरी झुडप त्याप्रमाणे

माय बापाचे कुळाला डाग लावते शेवटी !
वाटच्या वाटसरा ! लेक चुडेल मोहना
जाते जन्माची वैरीण लावून नाकाला चुना !
लेक जन्मते वेमवा आईची रे ! तिच्या कूस
वाटच्या वाटसरा ! तिच्या पित्याला जा पूस !
वाटच्या वाटसरा ! वाटेनं तूं जाय उगा
आला आंबा जरी पाडा नाही तुझ्या हाता जोगा !
वाटच्या वाटसरा ! नको करू उभा घोडा
कथ माहा जगलांत मोजे वाघिणीच्या दाढा !

---

## जाणे शेवटीं एकले ! : ५३

वाटेन चालताना दोन्ही दंडभुजा झाक
नांव पित्याच तू राख
वाटेन चालतांना नको जाऊ उभ्यागल्ली
मामा बांधतो हवेली
वाटेन चालतांना नको टाकू खाली शेव[1]
उभा पुढ महादेव !
काळी चंद्रकळा पदरी रामबाण
नेस तूग ! सवास्नीण !
दंडावर चोळी साजल तिन स्यावी
कंगणी पट्टू द्यावी
पुसतील सख्या "तुला भाऊ आहे किती !"
नको सांगूं एकाएकी !

---

१ पदर

## जाळीं उरल्याची गुंफ

माहेरीं देशमुखी घरीं तुझ्या पाटिलकी !
नको निघू एकाएकी !
काशी म्हणतांना सहा महिन्यांची वरी
नको जाऊ धवल गिरी !
मोठे डोळे बाई ! नको भिऊ हरिणाई !
घरीं येतां तुझा शाही !
गोरे बाई सुने ! काढ चुनडीचा शेव
नटाजोगा वासुदेव !
गोरे बाई सुने ! हळू बोल तू घरात
येता कथ अंगणांत !
बारिक पिठाची कर भाकर सवाण
पुरुषाला अभिमान
नवतीची ज्वानी नाहीं पुरत जन्माला
नको हासू म्हाताऱ्याला !
कोणाच घरदार बाई ! कोणाचे लेकर
जाणे शेवटीं एकले !

---

## जाळी उरल्याची गुंफ : : ५४

रुसले जावई बसले बिद्रावनी[1]
जोडले हात दोनी रागाच करा पाणी !
रुसले जावई समजावूं कोण्या परी ?
हाती अमृताची झारी उभी मालन सामोरी !

१ वृंदावनीं

रुसले जावई समजावू कोण्या[1] काठीं ?
हाती अमृताची वाटी गेली मैना वर भेटी !
रुसले जावई केल्या देऊं पांच गाई
नाहीं समजत बाई ! मागती कां बागशाही ?
रुसले जावई केले देऊ वाटी ताट
काय मनांतली गांठ नाही उकलत आट !
रुसले जावई केले देऊ पांच खांड
मागती कठी कड नाही बोलत का गोड ?
रुसले जावई हाताच्या मुद्रीसाठी
मोहर दिली हातीं मागे हिऱ्याची अगठी !
रुसले जावई नाहीं पलंगी बसले
धड कोणाशी न बोले राग कायचा[2] ना कळे !
रुसले जावई याई ! आपल्या मानाले[3]
करा मान पान सारे आणा दिवाळी सणाले !
सेवयाचा घास गोड जावयाच्या ताटीं
बाई ! एवढा आग्रह लेकी मालिनीच्यासाठीं !
रोज आयुष्य चिंतिले लेकी आधीं जावयाला
माझ्या लाडाच्या मैनाला बाई ! राज भोगायाला !
लेकीचे जीवासाठीं भारी जावयाची गोष्टी
लेक जीवाच्या आतली गोड साखरेची पुडी !

*       *       *

शेरभर सोनियाचा कर विठोबाला गोफ
आपली ते रुक्माबाई झाली उरल्याची गुंफ !

---

१ कोण्या प्रकाराने २ कशाचा ३ मानाला

## माहे दोन्हीकडे नेत्र ! : : ५५

लाडक्या लेकीला आंदण आमराई
मागे सोन्याची समई !
लाडक्या लेकीला आंदण बारा म्हशी
कामाला मागे दासी
लाडक्या लेकीला आंदण ताटवाटी
हसली गाईसाठी
लाडक्या लेकीला दिला आंदण गडवा
मागे नंदीचा थडवा !
लाडक्या लेकीला पानांचा मोठा लाव[1]
आंधण अजनगांव !
लाडक्या लेकीला गोड लाडवाच खाज
झालं गाडीवर ओझं !
लाडक्या लेकीला गुडाचा सवरात[2]
पुरवे चंद्रला हात !
लाडकी माही लेक चुलत्याची बाईबटा[3]
भरला खाज्यांनी ओटा !
लाडकी माही लेक नका नेऊ बाई ! गांवा
उन्हाच्या लागे झांवा !
लाडकी माही लेक मोठी मामाची लाडकी
मागे आंदण पालखी !

१ हौस, आवड २ आवड ३ बाई, बेटा, प्रीतीने आळवण्याचे नाव

# वऱ्हाडी लोकगीते

माझ्या मैनाला आंदण तांड्याच पंचीपाग
साजाच मंगळसूत्र !
लाडक्या लेकीला रोज भातक्याचा लावा
घरी हलवाई ठेवा !
लाडकी माही मैना उपाशी लागे निजूं
बताशे टाका भिजूं !
लाडकी माही मैना निजे उपाशी घरांत
भिजे साखर तुपांत !
लाडकी माही मैना धकत नाहीं भात
आणा मिठाई ताटांत !
शेरभर सोनं गुंजीभर उण
करा मैनाला टोपण !
शिंपीण सयाबाई ! लाव मोती शिवणीला
चोळी बेतते मैनेला !
लाडाची लाडकी भ्रताराची मोठी लोभी
पलंगा शेजी उभी !
लाडाची लेक माही झाली सार सासऱ्याला
लावा भोई पालखीला !
लाडाची लाडकी जाते सासऱ्या चांगुणा
चिमून[1] झाली चुना !

* * *

राहे इकडे तिकडे माहे दोन्हीकडे नेत्र !
बोले मैना "धाडा पत्र !"

१ कोमेजून

## भाऊजी म्हणा "राम" : : ५६

माझ्या मरणाचे वेळीं — माझ्या मातेला बोलवा
गोड साखरेचं पाणी — टाका तोंडीं द्या ओलावा !
माझ्या मरणाचे वेळीं — आयाबायाची दाटण
आली मायबाई माझी — आंत कवाड लोटून !
माझ्या मरणाचे वेळीं — जनां पडलं सांकडे
बंधुज्या बागामंदी — चंदन बेलाचे लाकडे !
माझ्या मरणाचे वेळीं — म्हणे देर "चला नेऊं"
जाऊ बोलली आंतून — "येऊं द्याना तिचे भाऊ"
माझ्या मरणाचे वेळीं — कुठ माय माझी पाहू ?
सेव[1] सवारल माझी — बहीण प्रीतीची जाऊ !
माझ्या मरणाचे वेळीं — रडल तो भाऊ धायीं
समजाव शेजी बाई ! — "बहीण एक नाहीं !"
माझ्या मरणाचे वेळीं — घाई करतील लोक !
बोलल माझी जाऊ — "तिचा येऊं द्या मालक"
माझ्या मरणाचे वेळीं — धाडा सांगून वावरीं
शेला कमरेचा गेला — पित्याला माझ्या भारी !
माझ्या मरणाचे वेळीं — कळल मातेला कसं
कडु लागला तोंडांत — अन्नाचा पाहिला घास !
माझ्या मरणाचे वेळीं — नका लावू वाजागाजा
ऊर कपाळ पिटून — माता रडल सारजा !
माझ्या मरणाचे वेळीं — जन बसतां कोठ्यांत !

---

1 शव

लावल कपाळा हात मायेचा दारोळ्यांत !
माह्या मरणाचे वेळीं देर भासरे उपाशी
केळी लावल्या कवळया जळल्या सरणापाशी !
माह्या मरणाचे वेळीं लोक सारे थडीथडी !
माहा कलिजा देहाचा मारते पाण्यांत बुडी !
माह्या मरणाचे वेळीं दूर जावई लोकांत
वेडा मुका लेक माहा पाणी टाकते मुखांत !
माह्या मरणाचे वेळीं भडके अगीन लाल
जिवा भावाच्या सख्यान वर झोकला गुलाल !
माह्या मरणाचे वेळीं टाका बैलांवर झुली
भाऊजी म्हणा ' राम ' बोळवण नाही झाली !

---

## एका कुशीचे वैरी झाले ! : : ५७

बाई ! बहीण भावंडे एकामेकाचे पाठीचे
नको माळिणी ! तूं तोडूं गोड अंजीर देठाचे !
बहीण भावंडाचा नित झगडा लोभाचा
कैवारी पिता माहा राहे सारखा दोघाचा
बहीण भावंडाचा झगडा कांहीं नाहीं !
लेकाचे कैवाराला नको निघूं मायबाई !
बहीण भावंडाचा झगडा वेशीपाशी
निवाड कारायाला चाल दादा ! पित्यापाशी
झाला बहिणीच्या पाठीं भाऊ कुलदीप राजा

# एका कुशीचे वैरी झाले

| | |
|---|---|
| " काठा ' बोलते बहीण | " चवथा हिस्सा माझा " |
| बहीण भावंडाचा | झगडा भातक्याचा |
| लोभ दोघांचा सारखा | लावा बाग वत्ताशाचा ! |
| राहे बहीण भावंडे | बाई ! एकाच मायेचे |
| दूर करतां तोडून | फूल कमळ जाईचे ! |
| आहे बहीण भावंडे | खाणीची एका माती |
| बाई ! निपजलें एका | शिपल्यामदी[1] मोती ! |
| बोळवण बहिणीची | कर चोळी लुगड्याची |
| नको पाहू माग पुढ | बहीण कलिज्याची ! |
| बोळवण बहिणीची | एका लुगड्याने काय |
| ताट गडवा आंदण | सोड गव्हाणीची गाय ! |
| उभी भावाची हवेली | वहिणीच तणघर |
| गोडी गुलाबीत दोघे | नांदती बरोबर |
| रोज भावाचे शेजारी | बहीण नाचारीची[2] |
| मांगे गोष्ट विचाराची | आपल्या ससाराची ! |
| कुपाच्या आसऱ्यान | वाढलें हिरवें तण |
| भावाचे शेजारांत | नांदे खुशाल बहीण ! |
| बहीण भावंडाचा | आहे शेजार कहीचा[3] |
| पराण्याची भावजय | कूप रुदला जाईचा ! |
| भावाचे शेजारांत | बहीण कशी नांदे |
| येतां भावजय घरीं | आडवी कसू[4] बांधे ! |

---

१ मध्यें २ गरीब ३ कधीचा, पुष्कळ दिवसापासून
४ भित

झाले वर्ष बाई ! बारा पडे भावासी अबोला !
नाही कळस चढला त्याच्या मोठ्या हवेलीला !
बहीण भावडाचा म्हणेल झगडा कोण
राहे पाठची बहीण अर्ध्या वाड्याची धनीण !
भांडती बहीण भाऊ एकाचे एक बाई !
पराण्याची भावजय रागाने कां लाल होई !
भांडते झगडते एकाचे ते एक होते
मारून कां कधी काडी[1] पाणी वाहते तुटते ?

*　　　　*　　　　*

सासासुनांचे झगडे बहीण भावांशी अबोले !
नवल कुशीचे एका पहा कसे वैरी झाले !

---

## मिठाची झाली लाही ! : : ५८

उभा गाईच्या गोठाणी गार्यांचा गायवाडा
तानुलीच्या दुधासाठी निवडा कालवडा !
हिरव्या गायवनी गाई खातील शेवरा[2]
तानुलीच्या दुधासाठी बांधा खुंट्याला भिवरा !
गाई निघाल्या गोठाणी चाले गायकी मागोनी
तानी हरपळ[3] माही धरा पळाली मैदानी
आथर बाई ! खाली सवाण सतरजी
गेली मांडीवर झोपी माही सोनुकली गोजी[4]

१ काठी २ एक प्रकारचे गवत ३ चपळ ४ गोजिरवाणी

# मिठाची झाली लाही

रोज वाटेनं खेळते
माझी लाडाची लहेरी[1] !
लोंबे गळ्यांत सोन्याची
सैल साखळी दुहेरी !
माझ्या तानुलीची टोपी
कोण तारोबारीं गुंफी
आले नगरचे कोण्या
कमखी बाई ! शिंपी
मिऱ्या सागाचं सामान
केला पाळ्याचा पाळणा
आंत गोरीपान माझी
ठेवा निजून चांगुणा !
धांव गाईकऱ्या दादा !
तुझ्या गाई रे ! कळाव
तानुलीच्या दुधासाठीं
चांदी भिवरा बोलाव
झुले पाळ्याचा पाळणा
लावा वर हलकरे[2]
बाळ मंदिरांत तानी
कशी गोड ललकारे !
पडे पायांचें पैंजण
अंगणीं तुळसीपाशीं
खेळवते मांडीवरी
आली पाहुणीण काशी !
उभ्या वाटेनं चालली
पहा माझी जगुमला !
पळे बाहेर खेळाला
चेंडु चांदणीनं नेला !
माझ्या तानुलीचा खेळ
कोणी कसा मोडियेला
दोन पहार दुपारी
वाटेन नंदी गेला !
आली बहिणीची सून
दुपारी जेवणाला
झाली एकाएकी दीठ
कशी माझ्या सोनुलीला !
डोळ्याला माझीं डोळा
रडते कां राहीरंभा ?
लागे जीव टांगणीला
झाला कामाचा खोळंबा !
पुरी नजर बुहारी[3]
कोण्या पापिणीची बाई !
तानी कोमावली माझी
मिठाची झाली लाही !

---

१ लहरी २ हलके ३ दुष्ट

## करे शेवट साजरा ! : : ५९

लगनाची नार सदा मिरवे देवतीं
घट धांगडी पाटाची[1] हिंडे पलंगाभवतीं !
पाटाच्या धांगडीला म्हणूं पाटकर नका
सुखी लगनाचा जोडा तिच्या कपाळीं पारखा !
लगनाची नार गोड अंगणींची केळ
घट धांगडी पाटाची कडु निंबोणीचं फळ !
लगनाची नार दिसे पाटलीण वाणी
घट धागडी पाटाची उफ्क्या ताटातले पाणी !
पाटाच्या धांगडीचा सहा महिने गजर
उतरतो एकाएकी लाल साडीचा पदर !
सोने शेरभर अंगी पाटाच्या धांगडीला
वाहता कसे कडू भोपळ्या सांगडीला[2] ?
लगनाची नार आंत कवाड लावून !
पाटाच्या धांगडीला मागे सुपारी फोडून
लगनाची नार खालीं लोळते धरणीं
पाटाच्या धांगडीची हातांनीं घाले वेणी !
लगनाची नार रोज बोलणीचे ठेवे
पाटाच्या धांगडीला पाटावर गोड मेवे !

१ मोहतुराची, पुनर्विवाहाची २ नदीतून भोपळे लावलेले एक तरून जाण्याचे साधन.

लगनाच्या लाडणीच्या जन्मतां पोटीं हिरा
पाटाच्या धांगडीचा उतरतो सारा तोरा!
पाटाच्या धांगडीचा चार दिवस नखरा!
नार लगनाची खरी करे शेवट साजरा!

---

## अहुळी मरण ! : : ६०

अहुळी[1] नार मेली घरीं शिक्यावर दही
टाकून राजा बाई! जाते कशी दूर सई
अहुळी नार मेली लाल कपाळीं टिकला
कसा भ्रताराचे आधीं गड नारीनं जिंकला!
बाई! अहुळी मरण काय कोणाला घडतें
कसे मायबाप वेडे कपाळ ऊर घेते!
सुखी अहुळी मरण कोणाच्या तें नशिबांत
बाई! पिवळे पातळ देर आणते हातांत!
अहुळी मरणाचा करे जो तो हळहळा
लोक बोलती " चालली गौर आपल्या माहेरा!"
सुखी अहुळी मरण करें भ्रताराच्या आधीं
शेल्याच्या पदरांत गुलाल पानामंदीं!
अहुळी मरणाची जन करिती जलदी
बाई! "पातळ पिवळे आणा म्हणती सकदी"!

---

१ सौभाग्यवती

अहुळी मरणीं मेली  तोंडाने उघड्या गेली
तिच्या भ्रतारानं केली  वर शेल्याची साऊली !
अहुळी नार मेली  खुले नाकामधीं नथ
नार भ्रताराचे खांदीं  चालली मिरवत !
खरें अहुळी मरण  रातचे शोभा देते
माळ्याच्या मशालीनं  पितांबर झळकते !
अहुळी मरणाचे  रचा देऊळ चांगलें
बंधु कारागिर तिचे  धांवून दुरून आले !
अहुळी मरणाची  करिती जन वज[1]
फुलांची माळ गळा  खालीं चंदनाची शेज
अहुळी मरणाच्या  टाका सरणांत जाई !
भरा ओटीं मायबाई !  येणें परतून नाहीं !

*        *        *

अहुळी नार मेली  गेला सरगांत[2] धुवा[3]
घात लेकरांचा झाला  काय केले तुवा देवा !
अहुळी नार मेली  नाहीं माय लेकराला
राजानें केली राणी  घरीं आपल्या सुखाला !

---

## माळ्याच्या वाडींत : : ६१

माळ्याच्या. वाडीमंदी कोण माळिण ठेंगण्या
हातीं सोनेरी कंगण्या

---

१ शोभा, मान २ स्वर्गांत ३ धूर

## माळ्याच्या वाडींत

माळ्याच्या वाडीमंदी माळीण माळी कोंबे
बागाची हवा खाये !
माळ्याच्या वाडीमंदी मोटीला हिरवा नाग
आते पाणी फुकफाडा
माळ्याच्या वाडीमंदी रुणझुणती घागऱ्या
वास सुटला मोगऱ्या !
माळ्याच्या वाडीमंदी खुळखुळती पाटऱ्या
केळी गर्भांत दाटऱ्या !
माळ्याच्या वाडीमंदी जेहवंध कांडोकांडी
होते दीठ घडीघडी !
माळ्याच्या वाडीमंदी मारे ज्योत लाल ताग
कोण्या गंभीराची बाग ?
माळ्याच्या वाडीमंदी माळी म्हणतांना गानं
माळीन देते कान !
माळ्याच्या वाडीमंदी आते पाणी संभाराला
ओलावला भाजीपाला !
माळ्याच्या वाडीमंदी फिरफिरते किंगारी
पाणी धावते डोंगरीं !
माळ्याच्या वाडीमंदी माळीण कामदार
एक दोघांचा विचार !
माळ्याच्या वाडीमंदी रोज माळीण प्रेमानें
फुलें तोडते नेमानें !

१ कोथिंबिरीला

माळ्याच्या वाडीमंदी नकी जाऊं तूं माळिणी
घरीं लेकी बाळंतिणी !
माळ्याच्या वाडीमंदी नको जाऊं मुसलमाना !
केळीचा गर्भ ताना !
माळ्याच्या वाडीमंदी भुजंग हिंडे ताजा
काळ्या धरणीचा राजा !
माळयाच्या वाडीमंदी डोल डोलते नागीण
राजइंद्राची कामीण !
माळयाच्या वाडीमंदी लागे माळीण कानासी
म्हणे " सुकल्या तुळसी ! "
माळयाच्या वाडीमंदी हिंडे नाग सावलीनं
पाजा पाणी ओंजळीन
माळयाच्या वाडीमंदी माळिणी दोघी जावा
कंबळ तोडी रावा !
माळ्याच्या वाडीमंदी निंबोणी आली रसा
गेला माळी दूर देशा !
माळ्याच्या वाडीमंदी लहरा मारे जाई !
माळ्याचा पत्ता नाहीं !

* * *

माळयाच्या वाडीमंदी झाड पतिव्रता कोण
कसा पुरुषा वाचून गर्भ टाकला केळीनं

## राखण देव शिरीं ! : : ६२

तानें ग लेकरू ताने रंग बाई ! केले
बाळ निजऱ्या मोडलें[1]

तानें ग लेकरू डोयीं जावळाचा भार
श्रीकृष्णाचा अवतार !

तानें ग लेकरू बाई ! कोणी त्या मारलं
घरीं रडत धाडलं

तानें ग लेकरू करते हे बुलूंबुलू
बोल त्याचें किती मेलू ?

ताने ग लेकरू मोठ गुणाच साजणी !
पाहे डहुळ रांजणीं !

ताने ग लेकरू भातक्या साठीं रडे
भर बाजारांत अडे !

तानें ग लेकरू लावे नजर दुकानीं
गेले कोकणाला वाणी !

ताने ग लेकरू माय त्याची कुठं गेली
भुकेची वेळ झाली !

तानें ग लेकरू रडणं हुबरड्याचं
हातीं सोनं बिंदल्याचं

तानें ग लेकरू रोज खेळणे मातीचं
फूल चंद्रज्योतीचं !

1 झोपेंतून जागे झाले. हुंबरड्यानं

तानें ग लेकरू खेळाला गेले लांब
हातीं भातक्याचा जांब !
तानें ग लेकरू बाई ! मोठे जिद्दीखोर
तोडे गळ्यांतला हार !
तानें ग लेकरू रडते काय करूं ?
मागे उडते पांखरू !
तानें ग लेकरू उमळते[1] अर्ध्यारातीं
मागे बाई ! चंद्र हातीं !
तानें ग लेकरू बाई ! तानपणीं गोर
पैंजणाच्या खालीं मोर !
तानें ग लेकरू टोपीला जावळयान !
लावलं मामाजीनं
तानें ग लेकरू चुलत्याच्या मागे लागे
मेवा दुकानांत मागे !
ताने ग लेकरू ठेवले निजून घरीं
राखण देव शिरीं

---

## पराया नारीसाठीं : : ६३

घराची अस्तुरी जसं कारल्याचं बोंड
बाहेरच्या नारीसाठीं धुतो गळीवर तोंड !

---

१ आळ घेते

## पराया नारीसाठीं

घराची अस्तुरी  कशी लसणाची कळी
बाहेरच्या नारीसाठीं  हातांत नेतो चोळी !
घराची अस्तुरी  जरी लसणाचा गाभा
बाहेरच्या नारीसाठीं  वळणी खालीं उभा
घराची अस्तुरी  कशी कवळी काकडी
बाहेरच्या नारीसाठीं  वाट चालतो वाकडी !
घराची अस्तुरी  सुपारी साठीं रडे !
बाहेरच्या नारीसाठीं  नेतो पानदानीं विडे !
घराची अस्तुरी  नाहीं सुपारीच खांड
रोज दासीच्या पलगीं  दोड्यांची सेलसांड[1]
घराची अस्तुरी  इधना साठीं रडे
दासीच्या आवारांत  सूड[2] चंदनाची पडे !
घराची अस्तुरी  पाडे लुगड्याला गांठा
बाहेरच्या नारीसाठीं  हिंडे नगराच्या पेठा !
घराची अस्तुरी  नाही तिच्या तोंडीं कणी
बाहेरच्या नारीसाठी  आबा पाडतो धरणीं
घराची अस्तुरी  बेजार लाजूं लाजूं
बाहेरच्या नारीसाठीं  खिशात नेतो काजू !
घराची अस्तुरी  सदा कवडाची बाही
पराया नारीला पैसा  देऊन सत्ता नाहीं !
घराची अस्तुरी  घरीं कवाडाची शेज
दासीशी बाहेरच्या  घडीची एका मौज !

१ पूर्णता  २ इंधन

घराची अस्तुरी तरवारीची अणी !
पराया नारीसाठीं सखा लागला झुरणी !

---

## जहरी नाग बाई ! : : ६४

रुसले भरतार समजावे नानापरी
तांब्याची हातीं झारी उभी राहिली सामोरी
रुसले भरतार दूर बसले जावोनी
अजून नाहीं आली खेळाला गेली तानी !
रुसले भरतार समजावे नानारीति
घरांत नाहीं कोणी आडस[1] गणपती !
रुसले भरतार बसले शेजी घरीं
'अन्याय माझे शिरी' जोडते हात गोरी
रुसले भरतार काय करतां चुकली
खूण भ्रताराची तिच्या पाया पडतां देखली !
रुसले भरतार जाणे कथाची कामीण
तिच्या साजणाची खूण डाव्या डोळ्याची लवण
रुसले भरतार मन त्याचे किती मोडे
हातीं पिकल्या पानांचे देते करून ही विडे !
रुसले भरतार केले विडे नखबोटीं
कंथाला कशी आली लटकी झोप मोठी !
रुसले भरतार विडे केले बाई ! चार

१ मध्यस्थ

देतां हातांत कंथाच्या बोलला तो 'शनिवार!'
हसले भरतार सुकले हातीं विडे!
सारी चिकण सुपारी लवंगा वाया दौडे!
हसले भरतार लागते गौरी पायां
बोले "पिकल्या पानांचे नका धाडूं विडे वाया?"
हसले भरतार हातीं अभ्रकाची वाटी
उठली लगबग कथाचे गेली भेटी
हसले भरतार फुलांची शेज केली
पुढं पानांची गंगोळी विनल्या करे गौरी!

* * *

हसले भरतार राजाचें राज्य गेलें
झाड करवती बाई! वनीं भयाण लागलें!
हसले भरतार राणीला देती रजा
लोकांच्या सांगोवांगीं बाई! बिघडला राजा।
हसले भरतार नाहीं म्हणावा आपला
शेजीच्या लावणीनं लाल हिंगुळ तापला!
हसला भरतार कधी भोळा म्हणूं नाहीं
नाग उशाचा[1] काळा जहरी मोठा बाई!

---



सासुच्या सासुरवास नंदाबाईची लावणी!
कळ लावते येवोनी दीड दिसाची पाहुणी!

[1] उशाचा

# वऱ्हाडी लोकगीतें

सासुचा सासुरवास      जाऊची जाळणूक
सदा हुडहुड जीवा      नाही कोणाचें तें सुख !

सासुचा सासुरवास      नंदाबाईच्या लावण्या
नाहीं घेत कानींमनीं      करी कथ संपादण्या !

सासुचा सासुरवास      हळूं नंदाबाई ! बोला
दारीं जोडा खडाडला !      कथ बाहेरुनी आला

सासुचा सासुरवास      रोज नहाण्या[1] तेलाचा !
वेणी फणी कुंकवाचा      नाहीं उजूर बोलाचा !

सासुचा सासुरवास      किल्ली कुलूप लावून
चाले मारझोड रोज      कोण पाहते येऊन

सासुरवासाखालीं      ढिले शस्त्रही अवघे !
काळ कठते कठिण      कार[2] अस्सलाची तगे !

एवढा सासुरवास      सांगू कोणापाशीं बाई !
रात कहराची जाई      नांदे सखा परगांवीं !

एवढा सासुरवास      कोण्या नसावा सुनेला
मुक्या गरीब गाईला      वनवासी सीतेला !

एवढा सासुरवास      सांगू कोणापाशीं रामा !
आटले गणगोत !      नाहीं भाऊ बाप मामा !

संसाराची हरिकथा      ऐका तुम्ही ग्यानवाना[3]
दाटे कंठ सांगतांना      पाणी नेत्रीं सांभाळेना !

सासुचा सासुरवास      मन सारखं विटलं
वाऱ्याच्या झडक्यान[4]      पान केळीच फाटलं !

१ न्हाण्याच्या  २ मुलगी  ३ शहाण्याने  ४ जोरानें

## पिंजरा पडे सुना

सासुचा सासुरवास करते तमतम[1] !
घालूं तोंडाला कुलूप करू बाई ! किती सम ?
सासुचा सासुरवास रोज टेकते वेशीला
जे ते बोलती सुनेला नाहीं वाली दुबळीला !
सासुचा सासुरवास नको करू असा माता !
तुझा राम बाई ! होता आली पराण्याची[2] सीता
सासुचा सासुरवास नका करू सासुबाई !
सुना गवळ्यांच्या गाई मनी नांदवणं नाहीं !
किती अस्तुरी गांजली गांजली परोपरी
जागा देवाजीच्या घरी भेटे न धरतरी[3] !
गाय अस्तुरी गांजली गांजली केसो मासीं
घरीं देवाजीच्या झाडा देशील एकादिसी !
सासुचा सासुरवास काय सांगूं शेजी बाई !
रांजणा खाली जाई फूल उगवत नाहीं !
सासु सासऱ्याचं दु:ख भ्रताराच थोडं सुख
नाहीं लेकी सारजेचं कधी दुखत ते नख !
सासु सासऱ्याचं सुख जरी भ्रताराचं दु:ख
लेकी सारजेचं कसं तोंड सुकते नाजुक !
सासुचा सासुरवास सोसते जीवावरी
सख्याच्या जीवासाठीं जाते रात शेवावरी[4] !

१ फणफण २ परक्याची ३ धरित्री, जमीन ४ पदरावर

एवढा सासुरवास झाला राम्माचे सीतेला
तेथून परिपाठ लागका दुनियेला!

*   *   *

भांडती सासासुना काय केले रे! दुस्माना!
राघो वनांत उडाला पिंजरा पडे सुना!

---

## माहेरा जाते बाई! : : ६६

माहेरा मी जाते बाई! बसीन पित्याङ्यापाशीं
गोष्ट ऐकीन हिताची मेईल दुसमा[1] काशी
माहेरा मी जाते बाई! बसायाला पाट पिढं
तूप सेवयाचं ताट भासा कवतीक पुढं!
माहेरा मी जाते बाई! नाहीं मात राहायाला
चार दिवस सुखांत माहेर ते भोगायाला
माहेरा मी जाते बाई! मास कोणाचा पाहीन
सून पित्याची लड्डान माझ्या बंधुची कामीण!
माहेरा मी जाते बाई! धुते पाय माझी माय
उभी राहते अंगणीं गर्वानं भावजय!
माहेरा मी जाते बाई! माहेर भोगायाला
मात्या माउलीच्या सुना रोज मला राबायाला
माहेरा मी जाते बाई! माहेरीं भाऊभासे
नांदे भरले गोकुळ वाडा आनंदाचा दिसे!

---

1 बिसांवा

# माहेरा जाते बाई

माहेरा मी जाते बाई ! माझ्या माहेराची रीत
माय साखरेचे लाडु बांधते शिदोरीला !
बैलांचा बाई ! बारा कोठा मोठा एकवाचा[1]
बावाजी माझा बाई ! नांदे कुणबी दैवाचा !
बैल गाडे घोडे बरी असामी टोलेजंग
पागोटी लाल रंग लोक पाहतांना दंग !
उभी माडीवर माडी पहा माझ्या बावाजीची
लंका झळके सोन्याची कशी माझ्या माहेराची !
लाल दिसते दुरून बाई ! दिवा देउळाचा
झेंडा फडके देवाचा कळस कां माहेराचा !
उभी माडीवर मामी दिवा जळते लोण्याचा
आंत पिवळा संदुक बाई ! भरून सोन्याचा !
उभी माडीवर माडी जळे दिवा राहूं राहूं
वर चौसर खेळती भावजय माझा भाऊ !
येती लागू माझ्या पाया दोघा बंधुच्या कामिनी
नथमीला हिरकणी चोळीला टीपा दोनी !
माहेरा मी जाते बाई ! भावजय चंद्रकळा
वाळू घालते बधुचा ओल्या धोतराचा पिळा !
रोज चांदीचा गडवा सोन्याची आचमणी
माझी मायबाई काशी घाले तुळसीला पाणी !

---

1 वेळवाची

माहेरा मी जाते बाई ! शिंपीण सया बाई !
आखुड घर बाही नट्टुली[1] भावजई !

* * *

करे बंधु देणं घेगं माय बांधते शिदोरी
कशी माहेराची वाट डोळां दिसते साजिरी !

---

## आवळी आली फुला ! : : ६७

झाले वर्ष बाई ! बारा माझ्या बंधुच्या नेमाला
बेल तांदुळ वाहतां महादेवाच्या पिंडीला !
आली चावडीच्या पुढ आवळी हिरवी फुला !
पुत्र बांधवाला झाला देव नवसा पावला !
दारीं चावडीच्या पुढ मानाची गुढी आली
चोळी अंगावर बाई ! नवी काढून फेकली !
बांधा चावडीच्या पुढ तोरणा रेशमी सुत
राजाला झाला पूत नाहीं आनंद मावत !
लवते कां डावा डोळा उजवी भूज खेळे
सगुण कां ठायीं ठायीं कोण पाहुणे गं ! आले ?
वाटेनें ठायीं ठायीं लाल पुरुषांचे खेडे
माझ्या[2] भाऊजीच्या काय नांद गाडीचा खडाडे !
भाऊजी आले नेऊं मला बाई ! बारशाला
ठेवा चौरंग अंगणी टाका पलंग बसाला[3]

१ ठेंगणी २ माझ्या ३ बसायाला

# आवळी आली फुला

लाल मलमाची[1] गाडी पाहतां कां दारीं सोडा
माझ्या बांधवाचे कोणी शेल्यानं जा बैल झाडा !
सोडा रंगांच्या बैलाला पाणी गंगाळात पाजा
आला भाऊ माझा राजा टाका बैठकींत बाजा
पुसे घरीं सासुबाई ! 'लाल कोणाचा मंदील ?'
आले कही दिवसाचे माहे भाऊजी पाटील !
आला भाऊ माझा बाई आज पाहुणा कईचा !
जेवणेवाला रोज तूप साखर पोळीचा !
पाहुणा मोठा लोक काय वाढू भाजीपाला
भाऊजी माझा रोज सोजीचा खाणेवाला !
पाहुणा बंधु घरी काय करू सासुबाई ?
तुपावेगळा बंधुला चालत घास नाहीं !
भाऊजी आले घरीं भाजीला कांहीं नाहीं
तोडा चवळीच्या शेगा निसते मी दादीबाई !
घरी बंधुजी पाहुणे काय रांधू माहे मना
बधुच्या जेवणाला घोळा साखर पुरणा !
गोड पुरणाची पोळी तुपाची वरून धार
भाऊजी आले घरी करीन पाहुणचार !
निऱ्या[2] साखरेच्या पोळया तुपा भरले गिल्लास
बंधु पाहतां डोळयांनीं मोठा जिवाला उल्हास !
आले बंधुजी पाहुणे काय करू काय वाढूं ?
काय बंधुचे जेवणा करूं बुंदीचे मी लाडू ?

---

१ पडद्याची २ निवळ

पांची पक्वान्नें भरून लागे बंधुराज जेऊं
ताटाला नाहीं रीघ पापड मी कुठं ठेवूं ?
बंधुजी आले घरीं विड्याला पान नाहीं
धाडूं कोणा कोण्याठायीं खेड्याची हे वस्ती बाई !
बंधु पान खाणेवाला सुपारी आली अंगा
बाई ! कोणीतरी मला झाड लवंगाचें सांगा !
माह्या बहिणीच्या पोटीं जन्मला बाळ मोती !
कही सोन्याचे बिंदुले घालीन मी त्याच्या हातीं !

---

## मंजुळ पायीं वाजा ! : : ६८

कसा वाटेनं चालला बाई ! माहा राजाराम
हातच्या रुमालानं डोईचा पुसा घाम
धांवे दुडदुडा पायीं गळ्यामधीं कठी गोफ
हातीं पायीं कडेतोडे लाडका गुणाचा लेक
बाई ! टीकाठुशी खालीं सरी बाईचा आकडा
बाळ राजस छकुला मधे ताईत फाकडा !
दिसे लोकाचं लेकरूं जसं बिदींचं[1] खापर !
माहा राजस छबडा सर मोत्यांचा टपोर !
रोज लोकाचं लेकरूं खेळते कूपकाटीं
बाळा राजसा रे ! गल्ली झाडते मी तुझ्यासाठीं !

---

[1] रस्त्यावरचें

# मंजुळ पायीं वाजा

बाळाचे आले डोळे डोळयाला लाली मोठी
भरीन काजळ हातीं लावीन मी अफु तुटी !
“ बाळराज बाळराज ” हाक मारते कव्हाची
सख्या हरी रे ! सोनुल्या ! कुठु खेळा गुंतलासी
पायीं तोड्या पैंजणाचा लागे गोड नाद काना
घरीं चौकांत रांगता लाडका राजस राणा !
ठेवूं दळणाची पाटी लपवुनी कोणिकडे
घरभर बाळ माहे हिंडे बाई ! चोहीकडे !
हातीं पायीं कडे तोडे खुले कानांत गोखरू
डोळे मोडून हांसते कसे लाडाचे लेकरू
काळे डोईवर बाल कसे माझ्या लाडक्याचे !
बाळ झोपतांना गात झाकते पलंगाचे !
काळे लबे लघे बाल उभे बालाचे आकडे
टक लावून पाहू मी किती त्याच्या तोंडाकडे !
अंगळ्या टोपऱ्याचा करीन बाळाला जामा[1]
रुमाल खिडक्याचा आणल भावाचा मामा !
रोज बाळाला सुखाची लागते झोप मोठी
नांदे वाड्यांत भरल्या लाडका लखपती !
कसा वाटेनं चालला डोलत हा गणराजा
वाजते पैंजणाचा मंजुळ पायीं वाजा !

---

१ पोषाख

## पहिल्यानं गरवार ! : : ६९

पहिल्यानं गरवार[1] म्हणते कां बाई " नाहीं "
हिच्या पाउलाची खूण देते कंबर ही गाही !
पहिल्यानं गरवार नाकीं नथनीचा रोख !
भरतार गुलहौशी लावी बुगडीला झोक !
पहिल्यानं गरवार मराठ मोळा लेणं
दंडाला बाजुबंद हातीं गुलाबी काकण !
पहिल्यानं गरवार सासु करते बाहुणा
धनी चतूर शाहणा ठेवे लिहून महिना !
पहिल्यानं गरवार दिसे तोंडावर लाली
पुसे बाई ! भरतार " कोण्या महिन्याले न्हाली " ?
पहिल्यानं गरवार अन्नाचा येते वास
भरतार गुलहौशी दारीं लावला गुलबास
पहिल्यानं गरवार बसे अन्नाची कावशी[2]
भरतार तिचा हौशी लावे अंगणीं तुळसी !
पहिल्यानं गरवार मन्सा[3] खाण्यावर नाहीं
पुरवतो भरतार नऊ महिने मिठाई !
पहिल्यानं गरवार येती अन्नाच्या हुलका
गेला भरतार बाई ! दूर पानांचे मुलखा !
पहिल्यानं गरवार मागे आंबट चिंबट
अंगोणीनं भरतार तोडे पिकलं कवठ

---

१ गर्भार २ किळस ३ मनीषा, इच्छा

पहिल्यानं गरवार महिना झाला दीड
गोड आंब्याचे शेंदरी मागते खाऊं पाड !
पहिल्यानं गरवार मागते साखर निंबु
गेला बागेत पुण्याच्या तिचा भरतार शंभु !
पहिल्यानं गरवार खाऊं वाटते पोपई
भरतार ठायीं ठायीं बागा हिंडवी शिपाई !
पहिल्यानं गरवार लेऊं वाटे उदा खण !
बाई ! भुजीवर डाव्या कसे शोभे बिंद्रावन !
पहिल्यानं गरवार घरीं राणीचा सोहळा
गडी पुसे गडियाला "कां रे ! गड्या ! तूं पिवळा" ?
पहिल्यान गरवार महिने नऊ बरे गेले
गरवारिच्या गादीचे देव खालीं उतरले !
पहिल्यानं गरवार महिने नऊ नवाकडे
शेवट निभावणे दिवस देवाकडे !

---

## काय वहिनी ! मनांत ! : : ७०

नार संपतीची मोठी चाले वहिनी तोऱ्यानें
भरजरीचा पदर वर उडतो वाऱ्यानें !
नथ नाकांतली बाई ! नाकाला झाली भारी !
नका वहिनी ! लावू हे गडे ! सरजे मोहरी[1] ?

---

१ प्रकार विशेष

नाकाच्या नथनीचा आखुड झाला दांडा
नथ शोभली वहिनी ! तुमच्या गोऱ्या तोंडा !
सोन कुसुंबी शालूचा आटा नवा उकलला !
वहिनी ! पहा दारीं सडा लवंगाचा झाला !
गोड बोलका भाऊजी माही वहिनी प्रीतीची
कशी राघोला दंडते[1] मैना राघोच्या तोलाची !
वर नजर करोनी पाहतां कां रांगूं रांगूं
गांवाला गेले दादा वहिनी ! किती सांगूं ?
घामानं गिलगिली बंधुरायाची रजई
घाला आंगणांत वाळू नका उभ्या राहूं बाई !
झाडा आंगण साजरे बाई ! काडी कचऱ्याचें
लाडा कौतुकाचा माहा भासा[2] आंगणांत नाचे !
नका खांद्यावर शेव वहिनी हा असा टाकूं
थट्टेल बंधु येतां लागलना घरीं टोकूं !
जरीचा धोतरजोडा नका करू बाई ! दांडी
बंधु दिवाणाची माझ्या मोठ्याच्या शेजी[4] मांडी !
वहिनी धुते धुणं दूर पदर[3] फेकून !
रगेल बधु कसा डोळे झांकते मागून
नाहीं रंगारीण बाई ! रंग तुहा गे ! साधला
शालु वहिनीचा माझ्या नाही गादला[5] निघाला !
गांवांच्या चावडींत बाई ! ओळी ओळी वाजा
घर माहा बंधुराजा भाऊ वळणांत तुझा !

१ शोभते २ भाचा ३ पदर ४ शेजारी
५ मळलेला

# काय वहिनी ! मनांत

बंधु तुमचा वहिनी ! पहा गोंधळ्याची कळा !
आला फार दिसां घाला माळ कवड्याची गळां !
बारिक पांढरं पीठ कर्म माझ्या मथुरेचं
करते वसरी ताट बंधुराज चातुराचं !
जाई मोगऱ्याच्या कळ्या लाल भरजरी शेल्या
सांगा वहिनी ! तुम्हाला गुफतां ह्या कशा आल्या ?
नथ नाकांत तुमच्या सरजे दूर दूर !
पहा आरशात रूप गुलाबी खुले नूर !
तंग दंडावर चोळी लेते वहिनी बुट्यांची
लाल चमक बिजली राणी माझ्या केवड्याची !
काळे लंबी लंबी बाल लावतां हें किती तेल ?
वेणी गुंतली वहिनी सागा कोण उकलंल ?
नाचणी नाचयेते बाई ! एका पायावर !
वहिनी ! मोडे डोळा कशी माझ्या बंधूवर !
रूळ शिंदेशाही तोडे वहिनी ! माही लेते
पायाला जड जातां चालतांना लचकते !
डुले हौसीच्या कानांत सोनियाचे कर्णफूल
ढोल डोलते कसे हे बुगडीच्या खाली झूल !
छत आरसे बिलोरी महाल लाल रंग !
शेज फुलांची जाईच्या ! आंत छपर पलंग !
जळे पितळी कंदील झगझगे लाल वात !
वाट कोणाची पाहतां काय वहिनी ! मनांत ?

---

## मैनाचे ओले केस ! : : ७१

जावई पाटील आपले होय कोण
नात लावते मालन
जावई पाटील पूत मायेचे पंडीत
लेक माही चंद्रज्योत !
जावई पाटील बाई ! कंठीचें पदक
लेक मालन अधिक !
जावई पाटील कंठीचे रुद्रमणी
लेक माही हिरकणी !
जावई पाटील चांदाचे गुरूभाऊ
रूप चांदणीला बहू !
जावई पाटील लाल रेशमाचा गोळा
मैना माही सवा तोळा !
जावई पाटील रत्नमालेचे माणिक
जाई तुऱ्याला अधिक
जावई पाटील बाई ! सुरतेला तेज
चंद्रावाणी माही बीज !
जावई पाटील शोभे सुरत सावळी
मैना मोहोर पिवळी !
जावई पाटील माही लाडकी यमुना
उभी सख्याच्या अंगणा !
जावई पाटील सोन्याचा पानपुडा
लाडकी देते विडा !

## फूल वाहतें नाजुक !

जावई पाटील पलंग पितळी गात
मैनाच्या पडे हात !
जावई पाटील उशी जाईच्या फुलाची
धार डोयीं अत्तराची !
जावई पाटील उशीचा झाला नास !
मैनाचे ओले केस !

---

## फूल वाहतें नाजुक ! : : ७२

राजामधें राज करी काळी गळसरी राज
कपाळीं कुंकु लाल चढवते कमे तेज
बाई ! सर्व लेणं लेली लेली सेवाच्या[1] आडून
कुकु कपाळीच लाल दिसे ठळक दुरून !
बाई ! सर्व लेणं लेली लेली लसण्या ताईत
कुंकु कपाळींचं लाल साऱ्या लेण्यांचा नाईक
माझ्या सोनेरी चुड्याचा घाट कोणाला येणार
माहे देव नारायण इद्रसभेचे सोनार
माझ्या पिवळ्या चुड्याचं सोन कसं शिवराई
बारा पालखिला भोई आंत मानाचा देसाई
सासु बाईचा कुमवा कसा निघाला चांगला
माझ्या कपाळाचं कुंकु राजा रहीस[2] शोभला !

१ पदराच्या २ घराणेदार

सासुबाईचा दह्यानं हात भरला घरांत
माझ्या चुड्याच्या सोन्याचा उजेड महालात !
माझ्या चुडियाच सोन चागलं बावन कशी
देव विठोबा पाहून बांधलं पदरी खुशी
माझ्या चुडियाच सोन कस बाई ! नालबंदी !
वाळूचा महादेव केली पूजा पानामंदी !
कपाळीं लेली कुकु सार कपाळ झाकल
नांव हरीच टाकल पाप पदरीं लपल !
बाई ! राजामधे राज राज भ्रताराचं भोळ
कुकु आताराच कोर चिन्याचा मोकळा घोळ
सर्व लेणं लेली लेली गळ्यात सारजा
लाल कपाळाचे कुकु लेण्याचा मर्‍यां[1] राजा !

* × ∴

बाई ! भ्रताराचे राजी मोठ भ्रताराच सुख
पिंडीवर शकराच्या फूल वाहते नाजुक !

---

## राजा कसा भुलवला ? : : ७३

बारीण बहिणा बाई ! हाती पान दे मोजून
हिरा बसला शेजून !
बारीण बहिणाबाई ! उघड तूं झोपा ताटी
सखा उभा पानांसाठी !

1 सर्ग

## राजा कसा भुलवला ?

बारीण बहिणाबाई ! पानांच्या या काढ शिरा
लाल गंभीराच्या कोरा !

बारीण बहिणाबाई ! पानांचे ग ! तोड देठ
लाल मदनाचे ओठ !

बारीण बहिणाबाई ! पानांचा ग ! पुडा बांध
गांवाला निघाला चांद !

बारीण बहिणाबाई ! पानांचा काढ डाला
भारी गिऱ्हाईक आला !

बारीण बहिणाबाई ! पान निवड बंगला
विडा रगू दे चांगला !

बारीण बहिणाबाई ! तुझे नवतीचे पान
तोंड रगते खाऊन !

बारीण बहिणाबाई ! नको चौकांत तू जाऊ
पानांचा नास बहू !

बारीण बहिणाबाई ! मोज आकड्याचे पानं
पहा दारांत मोहन !

बारीण बहिणाबाई ! बांध पान बेगीबेगी
घोडी उभी ग ! सारंगी !

बारीण बहिणाबाई ! तुझ्या पानांची आवड
केली बाऱ्याची सावड[1] !

बारीण बहिणाबाई ! पान खाऊन पैशाचे
तोंड रगू दे हौशाचे !

---

१ हिस्सेदारी

बारीण बहिणाबाई ! सांग कुठं तुहा वाडा
रंगू दे ग ! दांत दाढा !
बारीण बहिणाबाई ! पानांचा तूं भाव सोड
बोल जरा मशी गोड !
बारीण बहिणाबाई ! सांग कोणा पाहसी
पान मोजतां भुलसी !

* * *

बाई ! साजरी सुंदर कोण बारियाची मुला [1] !
पानांच्या ग ! विड्यामदी राजा कसा भुलवला !

---

## लाल कुसुंबी पागोटी ! : : ७४

| | |
|---|---|
| लाल कुसुंबी पागोटी | शिरीं पेचाची बांधली |
| लखलखीत चांदणी | शुक्राची कां उगवली ! |
| लाल कुसुंबी पागोटी | बांधणी शिंदेशाही |
| दडे [2] बाणा मोंगलाई | सखा मानाचा देसाई ! |
| लाल कुसुंबी पागोटी | बांधली आळागोळा |
| खुले मामाजीची निळा | वान सावळा शोभला |
| लाल अंगरखा अंगीं | पायांत दाटे जोडा |
| गुणाचा साजण मोठा | गोड साखरेचा पुडा ! |
| कमरेला तरवार | बाई ! पाठीवर ढाल |
| घोड्याची राउताच्या | तुरकी कशी चाल ! |

१ मुलगी २ शोभे

## लाल कुसुंबी पागोटी !

रेशीमकाठी जोडा कस पाहुण रोखाचं
बाई ! चालण टीपोचं[1] काय सांगू राजसाचं
सख्या रोज धुतो अंग तांब्याच्या गंगाळांत
रुइफुली जरिकाठी मागे धोतर हातांत !
शोभे हत्याच्या[2] मस्तकीं सोन्याच पिंपळपान
वर राजबिंडा सख्या कसा चालला बसून !
बाई ! मोठे मोठे डोळे ! निळ्या आरशाचे भिंग
सख्या चालता थाटांत कचेरी उभी दंग !
किती मोठे मोठे डोळे भिवया काळ्या रुंद
खुले कपाळीं सख्याच्या केशरी लाल गंध !
गळयांत कंठी गोफ कानांत भीकबाळी
बाई ! माझ्या सरदारा शोभली तालेवारी !
मऊ गादीवर उशी शाल लाल पांघरासी
राघो गोड बोलायासी सख्या शेजी गुलहौसी !
पिकलें पान रोज खातो पलंगीं बसून
रंगतो मुखीं विडा साजणी ! प्रीतीगुणं !
कवळया तोंडावरी झाला मुख्मांचा सडा
कसा फुलला केवडा सुगंधी वेलदोडा !

*   *   *

बाई ! फुटली बांगडी हातीं टिचला बिल्लोर
सख्याची ग ! भरज्वानी जसा आंब्याचा फुल्लोर

---

१ शिस्तीचं २ हत्तीच्या

## उभ्या मांडवाचे दारीं ! : : ७५

उभ्या मांडवाचे दारी बोहले सवाहात
लाल झालरी छताला शोभे कारजे मधांत !
उभ्या मांडवाचे दारी नुपर[1] गेल्या डेळी
मामा आणुनी हातांनीं लावतो हिरव्या केळी !
उभ्या मांडवाचे दारी अपुरा झाला जांबा[2]
मामा तोडून हातांनीं झांकतो वरून आंबा !
उभ्या मांडवाचे दारी नाहीं न्हात न्हाणोऱ्यांत
मोठ्याचा नवरदेव मागे कळी गगाळांत !
उभ्या मांडवाचे दारी रथाला लावा हात
सवासणी पांचजणी नवरा काशिनाथ !
उभ्या मांडवाचे दारीं आपण हातोहातीं
टाकूं बोहल्याचे पेड येतील मामाजी रातीं
उभ्या मांडवाचे दारीं कशा लवतील भुजा
दिसीं लगनाच्या मामा राहील मागोनी उभा !
उभ्या मांडवाचे दारी होतील वऱ्हाडी जमा
दिसी ताबुळाच्या हाती घालील उसंगीं मामा !
उभ्या मांडवाचे दारी झोड अहेराची झाली
सुटली बंधुची गाडी सोडली पिवळी बाली !
उभ्या मांडवाचे दारीं रागोळी जागोजागी
मानाच्या पहा उभ्या वरमाया दोघीतिघी !

१ उण्या २ जांभळीचीं, डाहाळें

# उभ्या मांडवाचे दारीं !

उभ्या मांडवाचे दारी कुणी रांगोळी काढली
रत्नाचा हातीं चुडा पहा वरमाय लेली !
उभ्या मांडवाचे दारीं कोण घडी घडी नाहे !
माय नवऱ्याची मानी मान चौरगाचा पाहे !
उभ्या मांडवाचे दारी वर फडकला झेंडा !
नेसली नवरी साडा पुसते ब्राम्हण वाडा !
उभ्या मांडवाचे दारी चिखल कां दाट झाला,
तांब्याच्या गंगाळात बाप नोवऱ्याचा न्हाला !
उभ्या मांडवाचे दारीं खेळते उभ्या गल्लीं
पिवळी कन्या केली लाडाची उजवली !
उभ्या मांडवाचे दारी हातनळे भुईनळे !
वरमायेचे चालले मानापानाचे सोहळे !
उभ्या मांडवाचे दारी चंद्रज्योत उजळली
कोण पाय धुण्यासाठीं मानाची उभी केली ?
उभ्या मांडवाचे दारीं मामा नवरीचा कोण ?
कानी मुडक्याचं सोनं लाल पागोटी बांधून !
उभ्या मांडवाचे दारीं गर्जेनी मंगल मूर्ती
ऐक लाडके ! तूं कानीं जोडा जन्माचा संगती !
उभ्या मांडवाचे दारीं नाहीं समईची चाड !
पडे नवऱ्या मुलीचा चंद्रज्योतीचा उजेड !

---

## माह्या आईनं न्हाणलं ! ७६

माह्या आईनं न्हाणलं कसं केसोकेसीं लोणी
सारी उकलली वेणी गेला वास द्वारकोणीं !
घरीं पांच गंगाळान आत आईन न्हाणलं
पाणी वेशीला टेकल करी नगरी नवल !
उभ्या चिंचीची साउली चिंचीच्या ते बरोबर
काय माउलीची सर करल ते सावतर[1] ?
बाई ! चिंचीची साउली राहे चिंचीच्या पुरती
सग्या[2] माउलीची सर कशी करल चुलती !
कधी डोईभर नाडा घालते का भावजई
सर जेवणाचे ठायीं काशीची त्या येत नाहीं !
मला मावशी परीस माही माउली अधीक
आहे मायबाई माही शुद्ध गंगेचे उदक !
सर माउलीची माह्या कशी करल मावशी
पंढरपुरी खण चोळी होईना पुरेशी !
माय म्हणतां मायेशी ओठाला ओंठ भिडे !
मावशी म्हणतांना अतर तें किती पडे
माया मायेच्या इतकी कोणा कधीं येत नाहीं
पाण्याचा तो थांग नाहीं भरे समुंदर[3] बाई !
चोळी आंगांतली माह्या फाटतांना भुजावर
चाळ्याच्या गंजीवर[4] धावे काशीची नजर !

१ सावत्र २ सख्या ३ समुद्र ४ कापडाचे दुकानावर

# माह्या आईनं न्हाणलं !

हिरव्या काळया चोळया    धाडते वरच्यावर
माउली माही काशी    भरल्या पेवल्या चार !
हिरव्यान् काळया चोळया    जरीकाठी रेशमाच्या
किती लेवू मोजणीच्या    माह्या माता सजणीच्या !
माउली माही धाडे    सुपारी लवंगा दोडे
गोफांचे ते करदोडे    रुमे नवे नवे नाडे !
गंगा जमनी घडीची    शिवे माय माही चोळी
बाई ! भुजांवर डाव्या    कशी काढली मासोळी !
गोड जेवण जेवली    माह्या माउलीच्या ताटी
भरल्या काठोकाठ    दह्या दुधाच्या ग वाटी !
जेवण जेवताना    टाके भातावर तूप
माह्या जेवणाची टूक    मारी काशीला ठाऊक !
जेवली मी पोटभर    दहीभात कालवला
आत्मा माउलीन माहा    पुरा बाई ! निववला !
कशी जेवण जेवली    गूळ मांडा शिरापुरी
वाट्या मांडल्या दोहिरी    ताटाच्या हारोहारीं !
मायबाई ! तुह्या घरी    कल राज रावणाच
पडलं म्या नाही ताट    उचलल जेवणाच !
घरीं मायबाई ! तुह्या    सुखाचा ह्या गेला जीव
घरी पराव्याचे किती    लागे वापराचं भेव[1] !
सदा शेजाच उसणं    आणल ते तस देणं
माह्या काशीच उसण    नित आडव्या मापानं !

---

१ भय

भूक लागतां पोटाला    हिंडीन सारा गांव
कोण काशीच्या वेगळं    मले[1] म्हणणार जेव'
गणगोतांनी भरून    माये बीना सारागांव
कठ पाण्यान सुकतां    घेते विहिरींची धांव !
आंब्याची आंबराई    पिकून होतांना सडा
जीव माउलीचा वेडा    म्हणे "पोरीला गाडी धाडा"
बाई ! उचकी लागली    पितां पाणी नाही गेली
याद माउलीनं केली    नाही मला विसरली !
जन्मली मी तुझ्या पोटी    कशी म्हणू तू ओगळ
गंगे परीस निर्मळ    तू ग केळी मी कवळ !
घेतला म्यां जन्म तुझ्या    शुद्ध केळीच्या कपाटी
थोर बावाजीच्या माझ्या    राज इंद्राच्या त्या पोटी !

---

## सासऱ्याला जातां ! : : ७७

सासऱ्याला जातां    हात गळ्यांत घालते
खांब गाडीचा धरते    मैना लाडाची रडते !
सासऱ्याला जातां    गणागोताची मालन !
भेटी भलाईनं सारा    गेला दिवस कलून !
सासऱ्याला जातां    वर ओलांडते माथा
जोडते दोन्ही हात    आपल्या साऱ्या गोता

[1] मला

## सासऱ्याला जातां !

सासऱ्याला जातां    नको रडू फुसूं फुसूं ?
सुजले रडून डोळे    किती शालोनं मी पुसू ?
सासऱ्याला जाता    दाट चिल्हाटींच बन
दोन्ही रस्त्याच्या बाजून शाल घेण[1] आवरून !
सासऱ्याला जाता    बोरी भराटी बाभुळ
गाडी बुरख्याची लाल नवी पडदी फाटल !
सासऱ्याला जातां    बाई ! गाडी उभी केली
भेटीला उतरली    मैना पाया लागूं आली
सासऱ्याला जातां    नका "रहा" म्हणू कोणी
सासुचा सासुरवास ! येने हृदय भरोनी !
सासऱ्याला जातां    सारे मागेपुढे लोक
भावाला मैना एक    नाही आनंदाच सुख ?
सासऱ्याला जाता    सदा येते न माहेरा
घाला न्हाऊं लाडकीला ताट लाडवाचे करा !
सासऱ्याला जातां    सासुरवास फेडा
साळीच्या भातावर    बत्तासे गोड फोडा
सासऱ्याला जाता    रडत कां सांग तरी ?
पाठीचा बधुराजा    देतो तुला धूरकरी !
सासऱ्याला जाता    मोठी ठकाऱ्याची[2] तानी !
आसु पुसा नेतराची सोडा लुगड्याची चिणी

---

१ घेई  २ ठसकाऱ्याची

सासऱ्याला जातां    लागल तोंडाला ऊन
हाणा गाडी साउलीनं केळीच्या बनांतून !

*    *    *

सासऱ्याला जातां    मैना मुळूमुळू रडे !
पाहे बाई तोंडाकडे    धकली गाडी पुढे !

---

## सूर्या डोलला दिवसा !    :    :    ७८

सख्या[1] भ्रताराच सुख    सांगतांना देवद्वारीं
पांची पांडवाची सभा    बसवीन मी सामोरी
मारे हाक सखा रोज    पाणी पिण्याच्या मिषानं
म्हणे गोडी गुलाबीन    "मोहना ! पाणी आण"
धुतां गंगाळांत अंग    फिरे चकार नजर !
पुसे "कुठ मैना नार    झालं पाणी थंडगार ! "
पुसे आवड एकांती    हात गळ्यांत घालोनी
म्हणे "आणूं कां पिंजेची[2]    बोल नथ मैनाराणी !"
हौस पुसतां भ्रतार    "काय साजणी ! मनाची ?"
टीक ठशाची निंब्रोणी    चाल सांगते सर्ज्याची !
केली भ्रताराच्या राजीं    लेण्याची भ्यां सारी खुशी
गोट पाटल्या सोन्याच्या    गळसरी खाली ठुशी !
नाहीं भ्रताराच्या राजीं    उरली लेण्याची गोडी
माळ पुतळयाची गळा    सरी खालती दुलडी !

१ प्रेमळ  २ पिंजरीची

# सूर्या डोलला दिवसा !

काय काय सांगू बाई ! लेण्याची माझ्या शोभा
तोडे शिंदेशाही पायीं खाली त्याच्या पायजिवा !
राहू दिला नाहीं गळा कमा बाई ! माझा पैस
फिटली लेण्याची हौस उरला नाही सोस !
सख्या भ्रताराच सुख सागू कोणापाशी रामा
येतां लाडक्याचा मामा सुख सांगीन विसामा !
येतां बाहेरून पुसे " मन मोहना ना दिसे ! "
कशीं बोलू एकाएकी घरी वडील माणसे !
पाय टाकतां दारांत म्हणे " विड्याचा खोळवा !
कुठ पळाली वालबा प्रीतीची माही रभा ? "
म्हणे " आल्या गाई घरी मालन कुठ गेली ? "
चतुर सासु बोले ' तेल नदादीपा घाली । "
येतो साडसूड भांत हाती लोटून कवाड
" पानाला लाव चुना " म्हणे " सुपारी फोड "
रोज कांकणाचा हात भ्रताराच्या उशा खुलीं !
लागते प्रीतीची झोप सख्याच्या रग महालीं !
राज भ्रताराचं सुखी केलं कसं साध भोळं
रोज जरीचं पातळ नेसली मी पायघोळ !
गोड भ्रताराचं सुख रातीं सांगतां अंगणीं
हासे नाजुक चांदणी तारा तुटला गगनीं !
गोड भ्रताराच सुख सांगताना येतां जातां
भर दिवसा डोलला वर सूर्या पाणी पितां

---

## उदार सती जीवा ! : : ७९

साडी चोळी रुक्मिणीला सत्यभामेला दोरवा[1]
अगणी तुळसा बाई थड पाण्याचा गारवा !
तुही तुळसा माउली ! जोवर ग ! ओली माती
रामाच्या पुजेसाठी तोडल्या मंजुळा राती !
पाला कवळा हिरवा गळतां पिवळा रस
गोड चांगुलपणाला देव कृष्ण तुहा खुश !
बिचारी तुळसाबाई झिझन होतां खोड !
देव विठोबान केल वसाया तिच पिढ
होतां तुळसा बाईच्या वाळून सनकाड्या !
देव विठोब्या पहा चालल्या मदिरीं गाड्या !
तुळसा मायबाई ! नका हिंडूं रानोवनीं
जागा पित्याच्या अगणीं ओट्यावरी बिंद्रावनीं[2] !

*  *  *

सुखाच घरदार दुःखाचा बाप राजा
टाके हातांनी निदानी वैद्याच्या घरीं बाजा !
सार सुखाच मासर दुःखाचा बाप भला
खांद्याचा नवा शेला देऊ वैदुराया केला
सुखाची सासुबाई ! दुःखाची मायबाई
वैद्याच्या हिंडे गांवी उन्हा पावसांत पायी !

*  *  *

संसाराची हरिकथा सांगतांना देवदारीं
कोण ऐकणार कानीं सभा सारी पाठमोरी !

---

१ सुती, साधे कापड  २ वृंदावनीं

# उदार सती जीवा !

जगी हासून बोलून संसार केला गोड
कोण जाणते चतूर सले अंतरांत फोड !
लेली हासून बोलून कपाळभर कुंकु
माहे अंतरींचे दुःख कोण जाणूं गेली सुख ?

* * *

मुक्या अस्तुरीची निंदा करू नको रे ! पुरुषा !
आपल्या मनामधी नार जळून कोळसा !
करते अस्तुरी नाट आपल्या इमानान
पुरुष का बेइमान गाय अस्तुरीच उण
सोळा सहस्र गोपीगण येतो भोगूनही शाही
अस्तुरी देते गाही पती माहे तसे नाहीं !
गोड साखरेचा पुडा लाल मुंग्यांनी वेढला
चालत्या प्रीतीमधीं कसा बिघाड पाडला !
चोळी अंगातली माही फाटून झाली चिंधी
गाईच्या कळपामधी माहा आनंदाचा नंदी !
पाखरूं राजहंस पिता पाणी निचंतीन
कावळ्या कुचिदान दिलं तळं डहुळून !
सुटली वाराधुंद झाडाला नाहीं पान
जंगलच्या पाखराच उडाल बाई ! मन !
पाखरूं राजहंस मोत्याचा चारा चरे
कोणा ठाऊक मनांत संगती साठी झुरे !
साहूं घडी घडी बोल किती विखाहुनी कडू
साजणी बाई ! माहे किती सांग मन मोडूं

पिकले वृंदावन खाउशा होते मन
घोळतांना साखरेत नाही जात कडूपण !
कसा वणवा लागला साऱ्या जंगलच्या तणा
भडकली आग पोटीं किती समजावूं मना
जात अस्तुरीची गाय जळे हातीं तिच्या दिवा !
सती समज पुरुषा ! उद्धार आपल्या जीवा !

---

## टांगा अंगणीं बंगई ! : : ८०

आलं पहिल्यान न्हाण हिरव्या ग ! साडीवर
गुंफा सोनेरी मखर
आलं पहिल्यान न्हाण बाई ! कस नेणतीला
नाही फूल शेवतीला !
आलं पहिल्यान न्हाण करा वसरीत जागा
दूर उभी चंद्रभागा !
आलं पहिल्यान न्हाण नका करू गाजावाजा
सखा नेणता ग माझा !
आलं पहिल्यान न्हाण सांगून धाडा बाई !
गोड खव्याची मिठाई
आलं पहिल्यान न्हाण घरीं बोलवा कासार
भरा चुडा दाणेदार !
आलं पहिल्यान न्हाण सांगा बाई ! पेटकरा[1]
साज तुरियाला करा

---

१ पटवे कऱ्याला

## हांसत सखा उभा !

आलं पहिल्यान न्हाण  साडी पिवळी जरीची
चोळी शेवती फुलाची
आलं पहिल्यान न्हाण  लावा मखराला जाळी
काढा रंगित रांगोळी !
आलं शुभ घडी न्हाण करा ऋतुशांति बाई !
टांगा अगणीं बगई !

---



पहिल्यान आलं न्हाण  मैना एकुलती एक
लाडा कौतुकाची लेक
पहिल्यान आलं न्हाण  दारी वाजंत्र्याचा ताफा
झाला कसाराला नफा !
पहिल्यान आलं न्हाण  बसवा शोभनी रंभा
करा बाई ! सारी शोभा !
पहिल्यानं आलं न्हाण  दारी सनई मंजुळ
घाला ओटीत नारळ
पहिल्यान आलं न्हाण  करा सोवळा साजरा
गुफा केळीनं न्हाणोरा
पहिल्यान आलं न्हाण  फेडा हौस पुरी बाई !
आणा बाळी पुणेशाही !
पहिल्यानं आलं न्हाण  अंगी चोळीचं घ्या माप
पिंताबर मोरछाप !

पहिल्यानं आलं न्हाण घाला खाऊं गोड मेवा
ओले अंजीर बोलवा
पहिल्यान आलं न्हाण उटी हळदीची अंगा
मांडा घरांत चौरंगा
पहिल्यानं आल न्हाण करा बाई ! सारवण
लाल खोलीच गभान
पहिल्यान आलं न्हाण मसूर तांबडा रग
चांदवा द्या वर तग
पहिल्यानं आलं न्हाण सुटे अत्तराची हवा
पलंग पितळी नवा !
पहिल्यानं आलं न्हाण घाला न्हाऊ सोडा वेणी
होम पुरवा साजणी !
पहिल्यान आलं न्हाण मखर देते शोभा
हांसत सखा उभा !

---

## नांव घे न्हाणकरिणी ! : : ८२

पहिल्यानं आलं न्हाण नका करू उतावळी
बारा वर्षांची पुतळी !
पहिल्यान आलं न्हाण चला पाहूं कौतुकाला
दोघे बसले नहाला
पहिल्यानं आलं न्हाण आली कौतुकाची वेळ
घाला ओटींत नारळ

## नांव घे न्हाणकरिणी !

पहिल्यानं आलं न्हाण नको लाजूं सख्या ! मनीं
आम्ही तुझ्या रे ! वहिणी !

पहिल्यानं आलं न्हाण बाळराज नागपुरी
सांगा साडी भरजरी

पहिल्यानं आलं न्हाण सासुसासऱ्याला खुषी
पातळ बोलवा देशी !

पहिल्यानं आलं न्हाण नंदेला लगबग
फुलोरा खोऊं लाग

पहिल्यानं आलं न्हाण ज्योत कंदिलाची लाल
शेजीं गुलाबाचे फूल !

पहिल्यानं आलं न्हाण आरसे मखरा लावा
वर गुलाबी चांदवा !

पहिल्यानं आलं न्हाण हौशी आहे कसा दीर
लावे मखराला मोर !

पहिल्यानं आलं न्हाण लावा मखराला मोती
रंगेल पुरा पती

पहिल्यानं आलं न्हाण चोळी हिरवी स्वस्तिक
मोठं नंदेला कौतुक

पहिल्यानं आलं न्हाण शेजीं झाले पुष्प दाट
रुततील कळ्या, देठ !

पहिल्यानं आलं न्हाण शेजी झाले पुष्प थोडे
माहेरा निरोप धाडे

पहिल्यानं आलं न्हाण गाणं सरलं साजणी !
नांव घे न्हाणकरिणी !

---

## डोळे वाटेकडे राहे ! : : ८३

बाई ! पहिल्या दिवशीं घरीं बोलवा ब्राम्हण
हातीं पंचांग घेऊन
लावा दुसऱ्या दिवशीं आंगा हळद चोखट
टाका चवरंग पाट
बाई ! तिसऱ्या दिवशीं चोरून घाला पाणी
करा आंत तेलफणी
धाडा चवथ्या दिवशीं गांव कसाराला विडा
हिरवा भरा चुडा
बाई ! पांचव्या दिवशीं लिहा सोनाराला पत्र
घडवा फुलपात्र !
बाई ! सहाव्या दिवशीं चौकांत झाली दाटी
भरा नारळानं ओटी !
दिसीं सातव्या दोड्यांनीं भरा जरीची पिवशी
करा उभी पलगाशी !
बाई ! आठव्या दिवशीं उभी खिडकीशी पाहे
डोळे वाटेकडे राहे !

---

## उभे महादेव पाराव्रती[1] ! : : ८४

बाई ! दळण दळते दळते मी पांच दाणे
झोपले पाळण्यांत सोनुले बाळ ताने

---

१ पार्वती

## उभे महादेव पारावती !

दळण दळतांना हाताला आले फोड
रथ ससाराचा बाई ! गेला कसा भारी जड !
नाहीं दळण काडणा रोज भगत रांधणा
नांव पित्याजीला येते थोर बहुत चंदना !
दळतां कांडतांना आसू गाळल पापीण
कार[1] अस्सलाची हात जोडते पुण्यवान !
सुपांतले ओले गहू दळते हे कारणाला
कृष्णाचा जन्म झाला गोकुळ अष्टमीला !
दळण दळतांना दडाला आले गोळे !
माता सजणीच माझ्या कसं मन करवळे !
जाते हातांनी ओढते ओढतां कां जड जाते
काशी कलिज्याची माझी धावून हात देते !
ओढत नाही मला जाते बाई ! एकलीला
जाते माझ्या माउलीला घरी तिच्या बोलायाला
जाते घागऱ्याचे बाई ! रोवते मी मंदिरांत
समोरच्या वसरीत जळे तेल कंदिलांत !
जाते ओढते बाई ! मी मणगटाच्या हे नेटे
माता कामिनीच माझ्या मोठं गडे ! दूध लाठे !
जाते मी ओढते बाई ! दोन्ही बोटाचे चिमटीं
माझ्या माउलीच्या मळा मोठ्या दुधाच्या हिंमती
जाते मी ओढते बाई ! आंग ओढतां डोलते
मणगटीं माउलीचे दूध सारखे खेळते !
नव सुतर ते दूध पेली बाई ! सरासरी !
झाली म्हणून मी आज माये ! तुझ्या बरोबरी !

१ मुलगी

नवसूतर[1] ते दूध कसून मी पेली पुरी
माये ! तानपणीं तुझ्या बसून ग ! मांडीवरी !
दूध माउलीचं कसं गोड अमृताचा डोणा
पिऊं वाटे बाई ! किती तृप्ती मनाची होईना !
तुझ्या अंगातली चोळी झाली आंगीं माझ्या तंग !
माउली ! मी ग ! तुही गोड चवळीची शेंग !
तुझ्या अंगातलीं चोळी माझ्या आंगाला होईना
झाली मायबाई तुझ्या बरोबरीची मी मैना !
दळण हे दळतांना आंगाच्या झाल्या गंगा !
माय ग माउलीन मला चारल्या लवंगा !
नाहीं भंगत दळणा बाह्या माझ्या लोखंडाच्या
घुटी माउलीनं माझ्या पाजल्या ग ! ड्यखंडाच्या

*  *  *

बाई ! दळण सरलं सरली सरस्वती !
उभे अंगणांत पहा महादेव पारावती !

---

## कोण्या शेवट गतीला ! : : ८५

देवा नारायणा ! साऱ्या दुनियेला तूं पावसी
कसा झाला रे ! निष्ठूर सांग बापा ! माझ्याविशी ?
दुबळेपण हे देवा ! जाईल कां धीरीधीरी
कधीं होईल शाहणा नेणता हा माझा हरी

---

१ नवीन

## कोण्या शेवट गतीला !

माझ्या दुबळे पणाची लाज वाटते जनाची
नको पाहूं आतां अंत इच्छा पुरव मनाची !
सारी दुबळेपणाची लाज गुंडाळते खोटी
देवा ! मनानें मोकळ्या सोडते पदरीं गांठीं !
मला दुबळेपणाचा अंदेशा हा पुरा आला
किती विटबना देवा ! कसा डोळा रे ! लावला ?
आला दुबळेपणाचा तसं सांगू किती बहू
साता जन्माच्या दुस्वाना नाचारी[1] तूं नको देऊं
सुख सांगू काय कोणा सारे दुःखाचे उमाळे !
कंठ दाटतो सांगतां बोल तोडीं अडखळे !
किती तहान लागते पडे ओठाला कोरड
सांगू कसे पोटांतले बोल निघेना रे ! धड
आपलं सुख दु:ख काय सांगू कोणा रामा
नाहीं वाली दुबळ्याचा कोणी ऐकण्या रिकामा
पोट तोडती कावळे धीर धरू कोठवरी ?
जीव चालला रे ! धांव सांभाळ ये तोल हरी
नाहीं सोसवत कळा जीवा सदा वनवास !
धरूं कोठवरी आशा येतील मिन्याला घोस
नार संपतीची मानी संपत ते तिची तिला
तोंड टाकून बोलतां झोंबे बाण काळजाला
फाटले हे दानखड नाहीं अवजे[3] भुंबळ
आधार न मार्ग पुढं सांगू कोणाचं मी बळ ?

---

१ गरीबी २ नेसुंचे लुगडें ३ उपयोगाला येत

# वऱ्हाडी लोकगीतें

सती द्रौपदी गांजली सभेमंदी उभी केली
कृष्णाजी बांधवाने वस्त्र तिला पुरवली !
सती द्रौपदी माईची हातीं आसुडतां निरी
मान देशाची चुनडी तुवा पुरवली हरी !
किटले हे रोज कान पोथ्या पुराण ऐकून
कसा माझ्याविशी कुठं निजला तो नारायण ?
भाऊ धर्माचा न कोणी नाहीं उभा कोणी बाप
कशी टाकली एकली काय पदरांत पाप ?
अंगाला येतो घाम मुरे अंगांत हा वैरी
शेवाच्या पदरानं कोण पुसल भिवरी ?
घरी अंबाडीची भाजी बिनकणीची रांधते
कोण येऊन पाहते रोज उपाशी निजते !
काढते मी देवा ! रेती काळा फोडुनी खडक
फोड हाताचे पिकोनी लागे कुटतां ठणक !
उडे आगाशी वावडी वारा तुफान सुटला !
आधार तुटका दोरा कोण्या शेवट गतीला ?

# शब्दसूचि

**या सूचीमध्यें तळटीपांत न दिलेले व सामान्य मराठींत प्रचलित नसलेले शब्द दिले आहेत.**

**( शब्दांपुढे पृष्ठांचे आकडे दिले आहेत )**

अगाजला (३०) – आगाजला, प्रख्यात झाला

अंदेशा (१२७) = संशय, खोट

आट (२७) = गर्व, तेढ

आढोगुढी (११) = संशय

आराधुरा (४८) = मागचा पुढचा विचार

उकळ्ती (५९) = वसूल करण्याचा अधिकार

कंथ (७२) = कांत, नवरा

कोरा (१०७) = कडा

गंभीर (८५) श्रीमंत

गुहीऱ्या (४८) = एक प्रकारचा विषारी साप

चकराची (४०) = भ्रमांत टाकणारी

चाळ्याच्या (२९) कापड विकणाऱ्याच्या

जगमला (८१) – लाडकी, जगांत एकटी प्रीय

झाडा (९३) = केल्या कर्मांचा हिशेब

टूक (११३) = संचय, आवड

डाला (१०७) = मोठे टोपले

डाहण्या (४८) = पट्टे

तलफ (७१) = सवय, व्यसन

ताव्या (२५) – कापड विकणारा

दाडी (० करणे) (१०२) = फाटलं वस्त्र शिवणे

दानखड (१२७) = नेसलेले जुने लुगडे

दुलडी (११६) = दो पदरी हार

धकली (११६) = चालली

धडाल (२२) = एकदम, सरळ

धुपावला (१४) = धुवून निघाला

नेट्टन (१८) = पायावर डोके टेकून

पाटकर (८२) = पाटाचा नवरा

पान (३८) = पान लागणे, सर्प चावणे

पावंडा (७१) = पाउल, पाउलाची सर नाही अशा अर्थी

पिंजेची (३) = पिंजरीची ( नथीचा प्रकार )
पीढं (११८) = पाट
बहुबेटी (७१) = लेकबाळ
बान्या (४८) = सर्पाचे वीष उतरण्या-करतां म्हणतात ते मंत्र अथवा गाणीं
बाली (१२१) = भारी लुगड्याचा प्रकार
भलाईनं (११४) = निरोप घेण्यानें
महीना (४९) = उदार, थोर
माल्ही (३२) = म्हाली, न्हावी
रवंदळ (१२) = नाश, सडघाण
राशी (३१)=(०निघणें)लग्नाच्या आधीं नवरीच्या मांडवांत जाण्यास निघणें
वान (५७) = वर्ण, रंग
वैतागवाडा (१४) = राणीला रुसून बसण्याकरितां महालांत केलेली जागा
शाही (४२) = राजबिंडा
सलदी (८३)= ?
सवाण (७३) = साफ
सवारल (७७) = तयार करील
साटोडी (३६) = साटोरी
सामावला (२९) आला, गर्भांत आला
सार (पाणी०) (६) = अंघोळीला पाणी काढणें
सार (करणें, होणें) (१३) = पाठविणें निघून जाणें
स्वास्तिक (१२३) = स्वस्तिक काढलेली
हातमुंडा (२३) = पुष्कळ जर असलेली
हुलका (१००) = वीट, ओकारी

# शुद्धिपत्र

| अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ | ओळ |
|---|---|---|---|
| पहिळी | पहिली | १ | ३ |
| टाफल | टाकल | १० | १६ |
| सारे | सार | १२ | १३ |
| ,, | ,, | १३ | १ |
| आजणाला | आजनाला[1] | १३ | १४ |
| सार | सार[2] | १३ | १९ |
| —— | वनाचे वनफळ सीताबाई तुदे लाडू | १४ | १६ |
| आळे | आले | १५ | ४ |
| गबळी | गवळी | २२ | १४ |
| डोळ | डोल | २३ | २२ |
| ककडीला | काकडीला | २४ | १५ |
| नाक झोक | नोकझोक | २८ | २४ |
| लेणारीण | लेणारीण[1] | २८ | २३ |
| विसाम्याला | विसाम्याला[3] | ३२ | १३ |
| मोतिचा | मोतिया | ४३ | २० |
| अस्तुरीचो | अस्तुरीची[3] | ४४ | १३ |
| अगीन | अगीन[4] | ४७ | १६ |
| शाळीचा | शालीचा | ५० | २ |
| धारी | भारी | ५६ | १८ |
| वळणीचा | लावणीचा | ६३ | [illegible]० |
| सानं | सोनं | ६४ | ५ |
| सौदा | हौदा | ७[illegible] | [illegible] |

| | | | |
|---|---|---|---|
| तडफीने | आदत, सवय | ७१ | २५ |
| शाक | पदर | ७७ | तळटीप |
| नाही | माही | ७८ | १५ |
| पराण्याची | पराव्याची | ७९ | १९ |
| ,, | ,, | ८० | ६ |
| बहिणीची | वाहिनीची | ८१ | १७ |
| लहरी | लाडकी | ८१ | तळटीप |
| हलके | हलके किंवा लोखंडी गज | ८१ | तळटीप |
| हुंबरड्याचं | हुंबरड्याचं[२] | ८७ | १९ |
| हुंबरड्याचं | २ हुंबरड्याचं | ८७ | २१ |
| जावळ्यान | जावळ पान | ८८ | ११ |
| इंधन | इंधन किंवा गंजी | ८९ | तळटीप |
| इसमा | इसामा | ९४ | ७ |
| टेंगणी | नखरेल | ९६ | तळटीप |
| पुरुषान्चे | पुरुषाचे | ९६ | १६ |
| कुठुं | कुठं | ९९ | ४ |
| खुली | खाली | ११७ | १५ |
| विठोब्या | विठोबाच्या | ११८ | ११ |
| सुख | सखु | ११९ | ४ |
| जगंलच्या | जंगलच्या | ११९ | १८ |
| बाळी | बाली | १२१ | १९ |
| मळा | मला | १२५ | २१ |
| दानखड | दानखड[२] | १२७ | २२ |

## शारदाश्रम, यवतमाळ

# प्रकाशित पुस्तकांची यादी

| | पुस्तकाचें नांव | ग्रंथकार व संपादक | किंमत |
|---|---|---|---|
| १ | महानुभावीय मराठी वाङ्मय | —य. खु. देशपांडे एम्. ए. एलूएल्. बी. | १ रु. |
| २ | ऋद्धिपूर-वर्णन | — ,, ,, | १॥ |
| ३ | विदर्भ वीणा | —जी. एन्. पंडीत बी.ए. एल्एल्. बी. | १॥ |
| ४ | आद्य मराठी कवयित्री | —वा. ना. देशपांडे | ॰॥॰ |
| ५ | विष्णुदासांची कविता भाग १ ला | —य. खु. देशपांडे एम्. ए. एल्. एल्. बी. —व डी. बी. महाजन बी. ए. | २ |
| ६ | विष्णुदासांची कविता भाग २ रा | —नरहरशास्त्री खर्शीकर | १॥ |
| ७ | एकादशस्कंद (भास्कर) | —प्रो. व्ही. बी. कोलते एम् ए.एल्एल्.बी. | १॥ |
| ८ | विनोद लहरी (संस्कृत) | —एम्. एन्. दाऊ बी. ए. एल्.एल्. बी. | १॥ |
| ९ | पुष्पमाला | —डी. आर. व्यवहारे | १ |
| १० | Local self Government | —एन्. पी. हिरुरकर एम्.ए. एल्एल्. बी. | १ |
| ११ | शारदाश्रम वार्षिक | —य. खु. देशपांडे एम्. ए. एल्एल्. बी. | १॥ |
| १२ | हिंदुस्थाना तूं कुठें ? | —डॉ. भा. म. टेंभे | १॥ |
| १३ | पराग ( काव्यसंग्रह ) | —ना. ना. हूड बी. ए. एल्.एल्. बी. | १॥ |
| १४ | विचार समीक्षा | —वा. ना. देशपांडे | २ |
| १५ | विष्णुदासांची कविता ( भाग १ ला. आ. दु. ) | —नरहरशास्त्री खर्शीकर | २ |
| १६ | चक्रपाणी चरित्र | —य. खु. देशपांडे एम्. ए. एल्एल्. बी. | ॰।॰ |
| १७ | वऱ्हाडी लोकगीतें | —पां. श्रा. गोरे | १॥ |